# वैतागवनांतील वाफारे



लेखक :

भा. रा. भागवत, बी. ए.

जानेवारी १९३९

किंमत एक रुपया

# आगींत तेल !

'वाफारे' प्रथम गेल्या वर्षी 'प्रकाश'मधून 'संत्रस्त' या टोपणनांवाखालीं प्रसिद्ध झाले. त्या वेळीं श्री. पु. बा. कुळकर्णी यांचा स्नेहशील साप्ताहिक ससेमिरा मागें नसता, तर 'वाफाऱ्यां'ची कल्पना हवेंतच विरून गेली असती !

शिवाय वैतागलेल्या मनाचें शांतवन करायला श्री. ताम्हनकरांसारखे स्नेही भेटले आणि 'संत्रस्ता'-च्या स्वैर वाफाऱ्यांनीं पोळण्याऐवजीं त्यांत ऊब मानणारे अनेक खिलाडू मित्र लाभले हेंहि माझें मोठें भाग्यच !

या सर्व मित्रमंडळींच्या ऋणांतून मुक्त होण्याची कल्पना मनांत येते तेव्हां आगींत तेल पडून मन अधिकच भडकून जातें. तेव्हां त्या कल्पनेला अजीबात 'अग्नये स्वाहा'च केलेलें बरें !

—लेखक



# समर्पण

(निरीश्वरवादाच्या चालू युगांत)



वैतागलेल्या मनःस्थितींतसुद्धां ज्याच्याबद्दल
अनुदार उद्गार काढून 'संत्रस्ता'नें आपल्या
तोंडची वाफ दवडली नाहीं, त्या



**परमेश्वरास**

# वणव्यापूर्वीचें शांतवन



अलीकडे अवर्षणामुळें इतर पिकें करपून जातात. तरारून उगवत असेल तर तें पीक एकच. आणि तें म्हणजे काव्याचें. या पिकांत नंदनवनें फुलतात; शीतल, मंद, सुगंधित वायुलहरी वाहतात. त्यांनीं क्षणभर मन उल्हसित होतें. पण जीवनकलहाचा वणवा शमविण्यास त्यांचा लवलेशहि उपयोग होत नाहीं. आणि मग मन खट्टू होतें, चिडतेंहि.

कल्पनांचे खेळ क्षणभर मौजेचे वाटले, तरी त्यांपासून जीवनास अत्यावश्यक असणारें सुख साध्य होत नाहीं. म्हणून प्रत्यक्षानुभवाचें महत्त्व विशेष असतें. हे प्रत्यक्षानुभव नेहमीं आनंदमय असतात असें नाहीं, कष्टप्रदहि असतात. तरीहि त्यांची स्मृति सुखदायक वाटते, मार्गदर्शक होते.

नंदनवनासारखें वैतागवन काल्पनिक नाहीं; तें प्रत्यक्ष आहे. तिथें कल्पनेच्या वायुलहरी नाहींत. खडतर अनुभवांच्या झळा आहेत. त्या झळांना वाफारे म्हटलें तरी त्यांची तीव्रता कमी थोडीच होते ? त्यांचे चरके वैतागवनाच्या वाटसरूस बसायचे तसे बसतात.

वाफाऱ्यांचा हा प्रभाव या पुस्तकांत उत्कृष्टपणें पहावयास सांपडतो. वैतागवनांतल्या संत्रस्त वाटसरूबद्दल कोणाच्याहि मनांत सहानुभूति उत्पन्न होईल. वैतागवनाचा दुरून दिसणारा देखावा नयनरम्य असतो आणि त्याला भुलून पुष्कळांना ती 'जिवाची मुंबई' करण्याची

जागा वाटते. त्याच जागेंत ठेचा कशा लागतात, कांटेकुटे किती बोचतात हें एखाद्यानें सांगितल्यास कित्येकांना खरेंहि वाटणार नाहीं ! उलट सांगणाऱ्यावर 'उगीच कांहींतरी रडगाणें' गाइल्याचा ते आरोप करतील. पण 'संत्रस्ताच्या वंशा' गेलेल्या दुसऱ्या संत्रस्ताला मात्र या रडगाण्यांतलें स्वारस्य बरोबर कळेल आणि कळतेंहि. अनुभवच आहे तसा.

परवां माझ्याकडे एक मुंबईकर पाहुणे आले होते. माझ्या टेबलावरील पुस्तकें चाळतां चाळतां त्यांच्या हाताला हे वाफारे लागले. आणि नवलाची गोष्ट ही कीं त्यांनीं पुरतें वाचून झाल्यावर ते खालीं ठेवले. आरशांत स्वतःचें रूप पहात बसण्यांत माणूस रमतो, त्याचप्रमाणें दुसऱ्यांच्या लेखनांत स्वतःच्या जीवनाचें प्रतिबिंब पाहण्यांतहि मजा वाटणें साहजिक नाहीं काय ? आरशांतलें स्वरूपदर्शनाचें सुख अवीट असतें; तें फिरफिरून घ्यावेंसें वाटतें. या वाफाऱ्यांत माझ्या मुंबईकर पाहुण्याला होणारें स्वरूपदर्शनहि असेंच अवीट होतें. कारण मी संध्याकाळीं कामावरून घरीं येऊन पाहतों तों पाहुणे त्याच वाफाऱ्यांत फिरून गर्क झालेले दिसले !

पुस्तक पुनः पुनः वाचावेंसें वाटणें ह्यापेक्षां लेखकाची यशस्विता दुसरी कोणती असेल ?

वर मीं 'रडगाणें' हा शब्द या अनुभवकथानकास लाविला आहे. आणि रडगाणें म्हटल्यावर तें कंटाळवाणें असेल असा एखाद्यास संशय येणें साहजिक आहे. पण वस्तुस्थिति मात्र अगदीं उलट आहे. वाफाऱ्यांनीं वैतागलेल्या संत्रस्ताचें हें रडगाणें मोठें मनोहर

आहे. पोरांनीं रडून घर डोक्यावर घेतलें म्हणजे जीव नकोसा होत असला तरी खेळकर तान्हुल्यास मुद्दाम रडविण्यांतहि मोठ्या माणसांना मौज वाटत असते. त्या रडयांतली मौजच या रडगाण्यांतहि अनुभवतां येईल.

दुसऱ्याची फजिती पाहून उघडपणें हसणें अशिष्टपणाचें ठरतें; म्हणून कोणी हंसत नाहीं. उलट त्याच्याबद्दल सहानुभूतीचें प्रदर्शन केलें जातें. पण दुसऱ्याच्या फजितीनें माणसाला थोडीतरी मौज वाटतेच ही गोष्ट खोटी नाहीं. माणसाचा हा मनोधर्म ओळखूनच संत्रस्तांनीं आपणांस झोंबणाऱ्या वाफाऱ्यांचें प्रदर्शन केलेलें दिसतें. या वाफाऱ्यांनीं त्यांची झालेली फटफजिती पाहून कोणालाहि त्यांची कींव येईल; पण त्याला भरपूर मौजहि वाटेल.

आणखीहि एक गंमत आहे या वाफाऱ्यांत. या वाफाऱ्यांचे कडक झोत एकसारखे सोसणें दुःसह असेल, पण एखादे वेळीं त्यांचा आस्वाद घेण्याचा मोह एखाद्याला झाला तर नवल नाहीं. जीवितयुद्धांत ठेचलेल्या, शिणलेल्या मनाला वाफाऱ्यांच्या थोड्या शेकभाजीनें आरामच वाटेल. आणि या उपचारासाठीं संत्रस्तांकडे धांव घेण्याचा मोहहि कित्येकांना होईल. ते संत्रस्तांकडे जाऊन म्हणतील : 'आम्हांला मुंबई दाखवा, चौपाटीवर फिरायला न्या, वांद्र्याच्या समुद्रकांठीं आम्हांलाहि हवा खायला यायचें आहे, ट्रॅमलोकलवांचून या वैतागवनांत आमचें चालणार नाहीं, सौ. वैनी माहेरीं गेल्या असल्या तरी आम्ही, तुम्ही न्याल त्या खाणावळींत येऊं आणि पोटभर जेवूं! तुम्ही करतां त्या झुरळाउंदरांच्या शिकारीची मजाहि आम्हांला पाहायची आहे. वैनी नसल्या तरी आम्ही तुमची खरेदीची मिरवणूक काढूं.'

आणि मग आधींच्या वाफाऱ्यांत या नव्या वाफाऱ्यांची भर पड-लेली पाहून संत्रस्तांची अवस्था काय होईल?

अति झाल्यावर येतें तसें हसून ते म्हणतील, 'दोस्तहो, खुशाल या. आणखी चार दोन वाफाऱ्यांचें वर्णन करावयाची संधि तुमच्यामुळें मिळणार हा काय लहानसान लाभ आहे?'

—ना. धों. ताम्हनकर

———

# अनुक्रमणिका

# वैतागवनांतील वाफारे



मुंबापुरीच्या बाह्य विलासाला भुलून तिला नंदनवन म्हणणारे कित्येक उथळ माथ्याचे लोक असतील. प्रस्तुत लेखक छातीवर हात ठेवून— ऊर बडवून म्हणा पाहिजे तर— मुंबई 'वैतागवन' आहे हें सिद्ध करीत आहे. नाहीं तरी मुंबईचा झगझगाट दुरून पाहण्यासारखा ! त्याच्या मुळाशी आगीचा केवढा डोंब उसळला आहे ते डोक्यांत राख घालणाऱ्या संत्रस्तांखेरीज इतरांना कसें समजणार?

## (१) जागा पहाणें ?

कांहीं दिवसांपूर्वी गोलपिठ्याजवळून दुपारीं बारा वाजतां चक्कर मारीत होतों तेव्हां मला एक विलक्षण दृश्य दिसलें. पायरस्त्याच्या कडेला दिव्याच्या खांबाजवळ पडून असलेल्या मोडक्या लोखंडी बाकावर त्या वेळीं तीन व्यक्ति बसलेल्या होत्या. त्यांपैकीं कडेची व्यक्ति किडकिडीत, उंचाडी व झुलपेवाली असून तिच्या तोंडांत जळणाऱ्या विडीवरून आणि गहिऱ्या नजरेवरून ती माजी स्त्रीपार्टी नट असावी हें उघड दिसत होतें.

या व्यक्तीचा उजवा हात मधून मधून खालीं वर होत होता. त्यावरून दुरून पाहणाऱ्या प्रेक्षकाला हा गृहस्थ मनांतल्या मनांत ताना तरी घेत असावा अगर पलीकडे गजांआड बसलेल्या व्यक्तीची 'चाललंच आहे; जग हें असं आहे' अशी समजूत घालीत असावा असें वाटण्यास जागा होती. याच्याशेजारीं मध्य-

भागीं बसलेली व्यक्ति फाटके व काळे, म्हणजे मळकट कपडे घातलेली असून तिची दाढी वाढलेली, केसांचें जंगल झालेलें असा तिचा अवतार होता. उजव्या हातानें तिचा फराळ चालला असून तिचा डावा हात मात्र चुकून शेजारीं बसलेल्या तिसऱ्या व्यक्तीच्या खिशांत जात होता.



तिसरा नमुना मात्र त्या दोघांशेजारीं न शोभण्याइतका अजब होता; कारण हा गृहस्थ सुटांत असून त्याची फेल्ट हॅट त्यानें मांडीवर सावरून धरली होती.

मला विलक्षण वाटलें तें या तिसऱ्या व्यक्तीला पाहून. पहिल्या दोन व्यक्तींसारखे नमुने त्या भागांत अनेक दिसतात. पण हा तिसरा नमुना मात्र त्या दोघांशेजारीं न शोभण्याइतका अजब होता. कारण

हा गृहस्थ उत्तम अर्धलोकरी व इस्त्रीच्या सुटांत असून त्याची फेल्ट हॅट त्यानें डाव्या हातानें मांडीवर सांवरून धरली होती व उजवा हात कपाळाला टेकला होता. तोंडांत लठ्ठ चिरूट असूनहि त्याला त्यांत कांहीं मौज वाटत असावी असें दिसत नव्हतें. माझें हृदय जात्याच लोण्यासारखें असल्यामुळें चट्दिशीं विरघळलें. माझ्या मनांत आलें, खात्रीनें बिचाऱ्याची जन्माची सोबतीण तरी मेली असेल किंवा त्याच्या मुलीचें लग्न तरी जमत नसेल. नाहीं तर भर बारा वाजतां– ज्या वेळीं त्याच्यामाझ्यासारखे लोक कचेऱ्यांतून खुर्चीवर बसलेले असायचे– तो असा गोलपिठ्यांतल्या एका बाकड्यावर एका नटाबरोबर व भिकाऱ्याबरोबर कशाला बसला असता? तेव्हां जवळ जाऊन त्याच्याशीं बोलण्याचा मीं हिय्या केलाच.

अगोदर हवा वाईट असल्याबद्दल गोष्टी काढून दिवस वाईट आले असल्याबद्दल मीं त्याला सांगितलें. पण तो कांहींच बोलेना. माझें अस्तित्वसुद्धां त्याला कळलेलें नसावें हें उघड दिसत होतें. दांतांनीं चिरूट दाबून तो आपला रस्त्यावरून वाहणाऱ्या गढूळ पाण्याच्या ओघाकडे पाहत होता. शेवटीं त्याला आपल्या कोटाचा खिसा तपासून पाहण्याविषयीं मित्रत्वाची सूचना मी देणार तों अगो-दरच त्याच्या शेजारचा भिकारी उठून चालूं लागला. बिचाऱ्याला आपली चूक समजून आली असावी.

लगेच मी त्याच्या जागेवर बसलों आणि नटाचे हातवारे आपल्या तोंडावर बसूं नयेत म्हणून काळजी घेत त्या गृहस्थाला प्रश्नांवर प्रश्न विचारूं लागलों. पण एकालाही त्यानें उत्तर दिलें नाहीं! बेकारीच्या प्रश्नांची मीमांसा करीत करीत शेवटीं मी कॉंग्रेसच्या मंत्रिमंडळावर

येऊन घसरलों होतों व 'तुम्हांला याबद्दल काय वाटतं ?' असा त्याला सवाल करीत होतों, तोंच........

मोठाले डोळे करून स्वप्नांत असल्याप्रमाणें शून्य नजरेनें समोर पाहत तो गृहस्थ ओरडला, "संडास स्वतंत्र !"

मी थक्कच झालों. एक तर याला वेडाची लहर आलेली असावी किंवा कोणी तरी– त्या भिकाऱ्यानें तर नसेल ?– त्याच्यावर मोहिनीमंत्र टाकलेला असावा. पण हे दोन्ही तर्क चूक आहेत असें दुसऱ्याच क्षणीं मला कळून चुकलें.

खाड्दिशीं माझ्याकडे मान वळवून तो गृहस्थ म्हणाला, "तुम्ही कधीं जागा पाहायला हिंडलेले दिसत नाहीं !"

मीं त्याला सांगितलें कीं, कित्येक वर्षांपूर्वी मुंबईला आलों तेव्हां वांद्र्याला एक जागा घेतली आणि प्राण गेला तरी ती सोडायची नाहीं असा त्या वेळीं केलेला निश्चय अद्याप पाळीत आलों आहें. यानंतर मनांत मीं असेंही म्हटलें, "प्राण गेल्यावर सोडीन. पण ती देखील मिरवत मिरवत ! कद्धीं सोडायचा नाहीं."

"शहाणे आहांत तुम्ही," तो गृहस्थ गंभीर मुद्रेनें म्हणाला, "तडीला न्या तो निश्चय. जागा बदलायचा बेत कराल तर माझ्या-सारखी दशा होईल तुमची !"

"बायको आहे ना तुम्हांला ?"

मीं सांगितलें, "आहे."

"मुलगी ?"

"आहे."—आणि असें म्हटल्यावर व्यवहारी मनांत निराळाच विचार येऊन मी गोदीचें वर्णनही करणार होतों तोंच त्या गृहस्थानें

"ऑल द वर्स! मग तर तुम्ही त्या फंदांत मुळींच पडूं नका" असा मला पोक्त सल्ला दिला. यावर 'म्हणजे काय बुवा? बायकोचा नी मुलीचा जागा पाहण्याशीं काय संबंध?' असें मी त्याला गाढवा-सारखें विचारलें. आणि तो जो कांहीं गरम झाला आहे म्हणतां!

माझ्याकडे त्यानें अशा नजरेनें पाहिलें कीं, जणूं कांहीं गरम वाफारेच सोडतो आहे. आपले दांत ओठ त्यानें इतक्या कडकडून चावले कीं, त्यामुळें चिरुटाचा काड्दिशीं तुकडा मोडून खालीं पडला. आणि तेवढ्यांत 'लाइन क्लिअर' झालेली पाहून पुन्हा त्या बाजूस आलेल्या त्या उद्धट भिकाऱ्यानें तो पटकन् उचलून तोंडांत घातला व माझ्याजवळ 'माचिस' मागूं लागला. मीं अर्थात् त्याला धक्के मारून घालवला "जागा पाहायला बाहेर पडा तुम्ही," त्या गृहस्थानें प्रवचन सुरू केलें, "म्हणजे कळेल सुख तुम्हांला! हळू हळू तुमचं डोकं इतकं भडकून जाईल कीं तुम्हांला वाटेल, नको हा जीव. तुमच्या-माझ्यासारखं कुटुंब ज्याचं आहे त्याला तर शेवटीं शेवटीं खात्री व्हायला लागते कीं, आपण जागा पाहायची म्हणजे काय केवळ निर्विकार निस्पृहबुद्धीनं! आपला त्यांत कांहींच संबंध नाहीं, संबंध सगळा बायकोचा नी पोरींबाळींचा! —अहो, काय सांगूं तुम्हांला? उद्यांच वर्ष पुरं होईल. तीनशें त्रेसष्ठ दिवस सारखा जागा पाहतों आहें. पण एक पसंत होईल तर शपथ!

"आमच्या कुटुंबाला आवडल ती जागा बाळीला आवडत नाहीं. बाळीला हवी असेल ती सुमीला नको असते. सुमीचं नी दमयंतीचं एकमत कधीं व्हायचं नाहीं. कमळी—पण जाऊं द्या. सगळ्या पोरींचीं नांवं घ्यायचीं म्हटलं तरी तुमचा किती वेळ संपल्यासारखा

होईल ! त्यांतून एक आहे लेखिका, एक आर्ट स्कूलमध्यें जाते, एक मेडिकल शिकते नी एकीला फुगड्यांचा नाद आहे. सगळ्यांना पटेल अशी जागा कशी मिळणार सांगा तुम्हीच !

"सुमी म्हणते चित्रांना नवी खोली हवी. दमीचं म्हणणं असं कीं, अफाट जनसमुद्र ज्या खिडकींतून दिसेल व ट्रॅमची घरघर मात्र ऐकूं यायची नाहीं, अशा खिडकीची खोली मला द्या म्हणजे मी वास्तवपूर्ण कादंबऱ्या लिहीन. सौभाग्यवतीचं तर कांहीं विचारूंच नका. त्या फळ्या पाहिजेत, तीं फडताळं हवींत-- एक ना दोन ! बरं, स्वैंपाकघरांत भरपूर फडताळं असलीं तर बैठकीच्या खोलींपैकीं एकींतसुद्धां असंच एखादं फडताळ असतं. अन् तें आमच्या वश्याला बिलकूल आवडत नाहीं. तो ज्यूनिअर बी. ए.त आहे. फडताळानं भिंतीची तर शोभा जातेच व शिवाय जागा अडल्यामुळं शेल्फ ठेवतां



"आपण उपनगरांत कां नाहीं जागा पाहात !"

येत नाहीं असं ते म्हणतो. बरं, फडताळं व बिनफडताळं व्यवस्थित असलीं तरी कुटुंब हरकत घेतं: 'दुभत्याचं कपाट नाहीं दिसत'. यावर 'अग, आणूं एक पांच रुपयांच' असं म्हटलं तर 'काय मेले पैसे खर्चायचे?' म्हणून माझ्यावरच उखडते."

"आपण उपनगरांत कां नाहीं जागा पाहात?" मीं सुचविलें. "प्रशस्त व सोयिस्कर मिळतात. शिवाय भाडं कमी. उदाहरणार्थ, मी स्वतः—"

"भाडं जास्ती द्यायला मी भीत नाहीं हो!" तो मध्येंच उत्तरला. "पण त्या तरी बाबतींत जमतंय कुठं सर्वांचं? उपनगरांत राहायला मी नी बंड्या फक्त तयार आहों. बिचारा बंड्या सहा वर्षांचा. त्याला कोण विचारतं?——"

"अन् तुम्ही छप्पन वर्षांचे. तुम्हांला कोण विचारतं?" मीं मनांत पुस्ती जोडली.

"त्याला आपलं बागडायला हवं, क्रिकेट खेळायला हवं, म्हणून माहीम माटुंगा पसंत. मला (किंचित् विमनस्कतेनें) संध्याकाळचा एक तास समुद्रावर वाळूंत बसून डोकं थंड करण्यासाठीं ती बाजू पसंत पडते. पण जाऊं द्या. आम्हांला कोण विचारणार? वश्याची उपनगरांत राहायला जोराची हरकत आहे. मेडिकलमधली लिव्हही दूर राहायला तयार नाहीं. अहो, तें तर जाऊं द्या सगळं. एकदां असा नमुनेदार प्लॉट मिळाला होता म्हणून सांगूं? ग्रॅन्ट रोडवर मध्यवस्तीला, भरपूर उजेडाचा, नळ संडास स्वतंत्रवाला फ्लॅट पाहिला. भाडं सारं नव्वद रुपये. डिपॉझिट भरलं, ठरवून टाकला.

"दुसऱ्या दिवशीं सौ. आणि कंपनीला आणलं. सर्वांनीं पसंतीचा

शिक्का मारला. मी तर थक्कच झालों. अंगाला— माझ्या— जोरजोरानें चिमटे घेतले व नंतर 'रिलायन्स लगेज रिमूव्हिंग कंपनी'कडे वाटाघाटी करायला गेलों. तों सौभाग्यवतीचा टेलिफोन आला : "मेलं जागा पाहतांना शुद्धीवर तरी असायचं होतं कीं ! सगळं आहे घराला पण दांड्या नाहींत !" मी संतापानें रिसीव्हर आपटला. "करायचं ना मग सामान रिमूव्ह ?" असं मॅनेजर विचारीत असतां "मलाच करा रिमूव्ह" असें खेकसलों नी बाहेर पडलों. दुसऱ्या दिवशीं सुदैवानं एक मित्र भेटला, त्याच्या गळ्यांत तो फ्लॅट बांधला!"

"तसंच एकदां--" थोडा श्वास घेऊन त्यानें पुढें म्हटलें, "--मला पक्का आठवतो तो दिवस. जागा पाहण्याच्या युगांतील एकशेंत्रेसष्टावा वार होता तो. दुपारीं ऑफिसला दांडी मारून दांडीवाला फ्लॅट पाहण्यासाठीं गिरगांवांत फेरी मारली. अन् असा कांहीं बेफाम फ्लॅट मिळाला आहे म्हणतां ! डायरी उघडून सगळ्या अटी वाचल्या. तंतोतंत सगळ्या जमत होत्या. रस्ता भरवस्तीचा असूनही ट्रॅम नव्हती. फडताळं, कपाटं, फळ्या व्यवस्थित, हव्या तिथं होत्या व नको तिथं नव्हत्या. प्रत्येकाला एकेक खोली वांटणीला आली असती; मला मात्र कदाचित् नसती मिळाली. पण मी (दांत ओठ चावून) बाथरूमवर माळा केलेला होता तिथं बसलों असतों.

"दांड्या इतक्या होत्या कीं आमचे सर्वांचे कपडे निशाणांसारखे टांगतां आले असते व उरलेल्या दांडीला आमची तालमींत जाणारी कमळी लोंबकळू शकली असती. संडासांत जाऊन पाहिलं, साखळी जागेवर होती. छताकडे पाहिलं, गळत नव्हतं. खिडकींतून मुद्दाम डोकावून पाहिलं-- सौ.च्या सूचनेप्रमाणें-- पलीकडे राहणारी बाई

चाईट चालीची दिसली नाहीं. निदान (आवंढा गिळून) मला तरी ती आवडली. झालं. लगेच फ्लॅट नक्की केला. भाडं मात्र आगाऊ भरलं नाहीं, कारण मागचा अनुभव होता. दुसऱ्या दिवशीं भाडं घेऊन गेलों. तों--- तो फ्लॅट गेलेला !" असें म्हणून त्यानें कपाळाला हात लावला.

मला गहिंवरून आलें. मीं त्याच्या खांद्यावर हात ठेवला व समाजाची चीड येऊन त्याला म्हटलें, "असं हात पाय गाळून कसं बरं चालेल ?— चला, उद्यां मी येतों तुमच्याबरोबर फ्लॅट पाहायला !"

"तुम्ही याल ?" तो डोळे पुसून आश्चर्यानें म्हणाला.

"काय झालं त्यांत?" मी उत्तरलों, "मित्रासाठीं एवढंसुद्धां करवायचं नाहीं मला ? आजपासून तुम्ही आम्ही मित्र झालों. चला, पलीकडल्या हॉटेलांत चहा पिऊं."

तो कृतज्ञतेनें माझ्याकडे पाहूं लागला. आम्ही दोघेही उठलों व एकमेकांच्या खांद्यावर हात ठेवून हॉटेलच्या दिशेनें चालूं लागलों. वाटेंत एक नवीन इमारत उठत होती. त्या बांधकामाकडे तिरस्कारानें पाहून तो गृहस्थ म्हणाला, "अगदीं नव्या बांधायला निघालेल्या इमारतीही पाहून झाल्या माझ्या. पण पसंतीला एकही येत नाहीं. सगळं होऊन आतां या गोलपिठ्याकडे कां झुकलों माहीत आहे ?"

मीं मान हलवली.

"गंधर्व पुन्हा नाटकं करायला लागला आहे. सुमीला पडला नाटकांचा नाद. तिचं म्हणणं असं कीं, थिएटर जवळ असावं म्हणजे रोज गंधर्वांचं दर्शन घडेल. कारण ती त्याची पूजक आहे.

नाहीं तर कशाला आलों असतों हो या घाणेरड्या वस्तींत ?–खरोखर (चीड येऊन) कधीं कधीं वाटतं कीं, आत्महत्या केलेली बरी. आतांशा स्वप्नांत तर मला सोटावाले पठाण, पान खाणारे भय्ये, त्यांच्या खाटा, दांडया नी संडास दिसायला लागले आहेत ! अन् फ्लॅट पाहून पाहून माझ्या मेंदूचे शंभर खणी फ्लॅट पडायला लागले आहेत. तुकडे तुकडे झाले कवटीचे !"

तो गृहस्थ इतकें बोलत होता तेव्हां आम्ही त्या पुऱ्या होत आलेल्या इमारतीखालून चाललों होतों. माझ्या मित्राचें वाक्य पुरें होण्याच्या सुमारास पहिल्या मजल्यावरून एकाएकीं दोरी तुटल्या-मुळें धाड्दिशीं कांहींतरी त्याच्या डोक्यांत पडलें. गृहस्थानें डोकें दाबून धरलें व तो कळवळून ओरडला.

मीं ती पायरस्त्यावर पडलेली जिन्नस उचलली

ती **To be let** ची पाटी होती !

———

## (२) स्त्रीदाक्षिण्य

स्त्रीदाक्षिण्याच्या या फाजील कैवाऱ्यांचा मला असा राग येतो किनई ! एकीकडे बायकांनीं समान हक्कांसाठीं भांडायचें अन् इकडे आम्ही मात्र सगळ्या हक्काची मिरासदारी बायकांना देऊन ठेवायची. तुम्ही आम्हांला गुलामांसारखे राबवता म्हणून एकीकडे आमच्या नांवानें त्यांनीं खडे फोडायचे अन् आम्ही बिचारे गुलामांसारखे राबतों तर त्या बाबतीत अवाक्षर न काढतां कानांवर खडे ठेवायचे ! म्हणजे माझें म्हणणें असें कीं, करून सवरून वर.....

आणि इतकें असून बाई दिसली रे दिसली कीं लगेच अदबीनें उभे राहणारे, दांत दाखवून ओठ फाडून हंसणारे, हातांतली फेल्ट हॅट गिरणींतल्या चक्राप्रमाणें गरगर फिरवीत पेटंट बुटांच्या टांचा उगाच खालीं वर करणारे लोक आहेतच कीं नाहींत ? म्हणजे बायकांना आदर दाखवूं नये असें माझें म्हणणें नाहीं पण त्याला कांहीं सीमा ? हातापायांचे चाळे करणें नी पाठीची कमान बनवणें ही काय आदराची पद्धत झाली ?

बनामा लेनमधला माझा मित्र रंगरावच घ्या. त्याचा तो सूट नी बूट नी तो एकंदर खाक्या पाहून घ्यावा नुसता. म्हणजे सूट घालूं नये असें नाहीं मी म्हणत, पण सूट घातल्याबरोबर आपल्यावर एक नवी जबाबदारी येऊन पडली आहे असें कित्येकांना वाटतें; तें नाहीं मला पसंत ! आपण सूट पेहेरला, आतां आपण पूर्वीपेक्षां तिप्पट स्त्रीदाक्षिण बनलें पाहिजे; अशी यांची समजूत ! मग जे धोतरांत

असतांना बायकांना नुसताच नमस्कार करून चालूं लागायचे, ते चक्क उभे राहतात, हॅट काढून घेतात— व बहुतेक वेळां ती चिखलांत पाडतात— स्मित करतात, 'कसं काय, इकडे कुठं?' पासून सुरवात करून तिकडे कुठें भरकटत जातात ते कांहीं विचारूंच नका. बिचाऱ्या त्या स्त्रीला कंटाळा आला असेल, आपलें वक्तृत्वही विशेष ऐकण्यासारखें नाहीं आणि तें या बाईच्या माथीं लादण्यांत आपण एटिकेट पाळण्याऐवजीं तो मोडीत आहों हें त्यांच्या गांवींही नसतें.

मी रंगरावाविषयीं बोलत होतों नाहीं का? तर सांगावयाचें काय, त्याच्या सुटाबुटाला माझी कांहींच हरकत नाहीं. सूटबूट कोण घालीत नाहीं? तुम्ही आम्ही सगळेच कधीं कधीं घालतों. पण सूटबूट घातल्यावर तुम्ही आम्ही पूर्वीप्रमाणें माणूसच राहतों; सर्कशींतलीं माकडें बनत नाहीं किंवा सिनेमांतले नायक बनत नाहीं.

रंगरावाचें तसें नाहीं. स्त्रिया भेटल्या कीं रंगरावाचें तें बोलणें चालणें पाहून असें वाटतें कीं, स्त्रियांसाठीं हा काय करणार नाहीं! क्वचित् प्रसंगीं आपली मानही तोडून ठेवील. बिचाऱ्याची वाकून वाकून मान आपोआपच तुटायला आली होती ही गोष्ट निराळी. ट्रॅममध्यें रंगराव अगदीं मागल्या बाकावर बसलेले असले अन् पुढून एकादी स्त्री चढून आंत आली कीं रंगराव सर्वांत आधीं लगबगीनें उठतात.

कधीं कधीं तर स्त्रीदाक्षिण लोकाची एकाच ट्रॅममध्यें भरती झालेला असते; आणि त्यामुळें होतें काय, कीं सर्व जण उठून उभे राहतात. एकदां काळबादेवीच्या ट्रॅमनें येतांना असेंच मीं एक दृश्य

पाहिलें होतें. मला वाटतें त्या वेळेला गाडींत कॉलेज विद्यार्थी, पार्शी आणि उच्चवेषभूषित असेच लोक फार होते. फक्त एकच लॉण्ड्री-वाला भय्या निराळा-निराळासा भासत होता. पायधुणीजवळ काय झालें, एक मुसलमान तरुणी पुढच्या बाजूनें चढून— स्त्रिया कधीं 'इन्'च्या दारानें आंत शिरत नाहींत; उदार मनानें त्यांना बहाल केलेल्या हक्काची बजावणी किती डोळ्यांत तेल घालून त्या करीत असतात तें पाहा! म्हणे, समान हक्क हवेत!— आंत आली. ताबडतोब तमाम ट्रॅम— म्हणजे आंतील लोक— उठून उभी होत्साती त्या स्त्रीकडे अदबीनें पाहूं लागली. फक्त लॉण्ड्रीवाला भय्या आपल्या बोचक्यावर हात ठेवून एकटाच आपल्या बाकावर बसला होता. त्या स्त्रीनें दुसरें तिसरें कांहीं केलें नाहीं; खाड् खाड् बूट वाजवीत त्या बाकाकडे प्रयाण केलें, भय्याच्या चौदा पिढ्यांचा उद्धार केला व तें बोचकें खालीं उतरवलें. आणि मग कंडक्टरला हांक मारून त्याला स्त्रीदाक्षिण्याबद्दल चार शिव्या सुनावल्या. चकित होऊन तमाम ट्रॅम पुन्हा खालीं बसली.

म्हणजे काय न्याय आहे तो पाहा!

मात्र फलटणींतील शिपायांसारखी एकदम उभी राहून एकदम खालीं बसलेली ती उतारूंची रांग अजून माझ्या डोळ्यांपुढें आहे. जणूं कांहीं 'वंदे मातरम्' पद म्हणायला सर्व उभे राहिले आणि पदावर बंदी घालण्यांत आल्यामुळें भेकडांसारखे खालीं बसले—असेंच कांहींसें वाटलें मला.

सामुदायिक स्त्रीदाक्षिण्याचा दुसराही एक प्रसंग मला चांगला आठवतो. त्या वेळीं आमची ट्रॅम महंमदअल्ली रोडवरून चालली होती.

कंडक्टर 'जगा नहीं' म्हणून ओरडत असतांनासुद्धां एक पार्शी स्त्री जबरीनें ट्रॅममध्यें चढली व आमच्या बाजूला आली. मी व रंगराव एका बाकावर बसलों होतों. रंगराव अर्थातच विंचू चावल्यासारखा उडी मारून उठला; व तीन तीनदां वाकून त्यानें त्या स्त्रीला बसण्यास विनविलें. ती अर्थातच त्याच्याकडे प्रसन्नतेनें पहात माझ्याशेजारीं बसली. रंगराव तिच्या आभारप्रदर्शक स्मिताला उत्तर म्हणून आपण उलट हास्य करूं लागला. रंगरावाचें हास्य नेहमींच माझ्या तळपायांची आग मस्तकाला नेतें. आमच्यांत असला म्हणजे बेटयाचा सदा सुतकी चेहरा. पण स्त्रियांना 'ग्रीट' करतांना मात्र याचें तोंड पाहून घ्यावें! जो. ई. ब्राऊनची नसेल एवढी याच्या जबड्याची लांबी. एकदां तर मला आठवतें, रंगराव दंतवैद्याकडून परत येत होता. वाटेंत मिस चपराकवाले भेटली. लगेच रंगरावांनीं फेल्ट हॅट काढून आपलें तोंड वासलें. मग घरीं आल्यावर बसला होता थोबाड दुखतें म्हणून. म्हणजे त्या बाईनें आपल्या नांवाप्रमाणें चपराक दिली असें नाहीं; पण 'डेंटिस्ट'ला दांत दाखवावयाचे नी लगेच ते स्त्रियांना दाखवायचे, म्हणजे— It is no joke.

त्या महंमदअल्ली रोडवरचा प्रसंग तसाच राहिला कीं! रंगरावानें त्या बाईला जागा दिली, ती बसली आणि तिनें पाकिटांतून चवली काढली. माझें त्या वेळीं तिच्याकडे लक्ष नव्हतें. मी आपला खिडकीबाहेर पहात होतों. पण तेवढ्यांत ती चवली तिच्या हातांतून निसटून वाटतें, खालीं कुठें तरी पडली. झालें. जो तो जागेवरून उठला व चवली शोधूं लागला. रंगरावाची धांदल तर विचारूंच नका. नुसता या बाकाखालीं वाक, त्या बाकाखालीं वाक व दुरूनच पाहा,

असें चाललें होतें. त्यानें प्रत्यक्ष कांहीं करणें शक्यच नव्हतें, कारण कपडयांची इस्त्री बिघडली असती.

शेवटीं ट्रॅमच्या त्या खालच्या मजल्यावर इतका गोंधळ उडाला, कीं हा प्रकार काय आहे म्हणून वरचे लोकही खालीं आले. पाहतात तों तमाम उतारू मांजरासारखे रांगत हिंडताहेत. तेवढ्यांत एका 'मांजराला' अडखळून कंडक्टर पडला व त्याची कातडी बॅग उपडी होऊन सर्वत्र पैशांचा पाऊस पडला. मग शेवटीं त्या बाईनें त्यांतली एक चवली उचलून त्याच्या हातावर ठेवली कीं उलट कंडक्टरच्याच कित्येक चवल्या त्या गडबडींत गहाळ झाल्या व त्यामुळें त्याला बिचाऱ्याला भुर्दण्ड बसला हें मला कांहीं माहीत नाहीं; एवढें मात्र आठवतें कीं, हा गोंधळ पाहून रेडिओ टॉकीजजवळचे बरेचसे मुसलमान व क्रॉफर्डमार्केटच्या पिछाडीचे कांहीं घाटी 'अरे दंगा हुवा–मार डालो–अरे ठोका––' करीत दोन्ही बाजूंनीं येऊन एकमेकांना भिडले व पुढें म्हणे, आमची ट्रॅम म्यूझिअमला जाऊन पोंचली तरी या भागांत किरकोळ दंगा चालूच होता.

स्त्रीदाक्षिण्य म्हणून उपकार करायला जावें तों आपलेंच हंसूं कसें होतें याचा मला एकदां अनुभव आला. याही वेळेस मी ट्रॅममधून चाललों होतों. पुढच्याच बाजूस एक काळीकिट्ट व पांढरी पावडर लावलेली स्त्री येऊन बसली; व एकसारखी वळून माझ्याकडे करुण नजरेनें पाहूं लागली. तिच्या डोळ्यांत आसवें होतीं आणि तिचे ओठ हालचाल करीत होते; त्यावरून तोंडांत तांबूल होता असें वाटत होतें. माझें हृदय फाटूनच गेलें. स्त्रीदाक्षिण्याचा टेंभा मी मिरवीत नाहीं. पण स्त्रियांना मदत करायला मी नेहमीं एका पाया-

वर तयार असतों. त्याप्रमाणें याही वेळेस एका पायावर उभा राहिलों. कारण दुसरा पाय शेजारीं बसलेल्या किरिस्तावाच्या बोंबलाच्या करंडींत अडकला होता. तो सोडवून घेऊन व त्याच्या थोडयाशा शिव्या खाऊन मी साहस करून त्या बाईच्या बाकावर जाऊन बसलों व नम्रतेनें म्हटलें, "आपणाला कोणतीही अडचण आली असेल तर मला सांगा; मी वाटेल तें करून आपणांस मदत करीन." यावर तिनें अश्रू आणून म्हटलें, "मेरी मनी बॅग मैं भूल गयी, अबी क्या करूं?"

"एवढंच ना?" असें म्हणून मीं लगेच एक आणा देऊन तिचें तिकीट काढलें. तिला वाटतें फोरॅस रोडला जायचें होतें; आणि घरचा रस्ता बरोबर माहीत नव्हता. तेव्हां निरुपायास्तव तिच्याबरोबर त्या ठिकाणीं खालीं उतरलों व उजव्या हातचें वळण घेऊन चालूं लागणार तों गिरगांवची दुसरी ट्रॅम आली व तिच्यांतून "ए म्हसोबा इकडे ये लेका!" अशी आरोळी ऐकूं आली वळून पाहतों तो रंगराव! चकित झालों व बाईजवळ दिलगिरी दर्शवून परत गेलों. वास्तविक त्या वेळीं तिच्याबरोबर तिच्या बिऱ्हाडीं जाणें हें माझें कर्तव्य होतें. पण मूर्खासारखा मी परत गेलों. जाणारे येणारे लोक त्या वेळीं माझ्याकडे व त्या बाईकडे पाहून स्मित करीत होते. माझ्या कर्तव्यबुद्धीचें त्यांना कौतुक वाटत होतें हें उघड दिसलें. पण रंगरावाची हाक ऐकतांच जेव्हां मीं माघार घेतली व त्या बाईला अनोळखी रस्त्यावर एकटी सोडली त्या वेळीं लोकांनीं व विशेषतः त्या बाईनें माझी काय किंमत केली असेल याची तुम्हीच कल्पना करा. रंगरावानें नंतर "वहिनीला सांगं का?" वगैरे बोलून माझी हजेरी घेतली; त्यामुळें

मी विशेषच कोडयांत पडलों.

आमच्या कॉलेजचा एक फॅशनेबल विद्यार्थी कांहीं वर्षांपूर्वी युरोपला जाऊन आला—आणि त्याच्या स्त्रीदाक्षिण्यांत इतकी कांहीं भर पडली म्हणतात! व्हिक्टोरिया राणीच्या काळीं म्हणे विलायतेंतील लोक स्त्रियांचे बाबतींत कमालीचा शिष्टाचार पाळीत असत. आमचा हा देसाई म्हणजे व्हिक्टोरियाकालीन नमुनाच म्हटला पाहिजे. काय त्याचें तें प्रत्येक शब्द तोलून बोलणें, बोलतांना काय तें उगाच हातांच्या पंज्यांची उघडझाप करणें! भुवया काय वर करतो, शिष्टासारखा तोलून मापून काय हसतो, बाहीवर धूळ बसलेली नसली तरी मधून मधून टिचक्या मारून ती साफ काय करतो; आणि विशेष म्हणजे एकसारखा वाकतो किती!

माझी खात्री आहे कीं, त्याचे हे चोजले पाहून स्त्रियांना हसावें कीं रडावें असें होत असेल. पण बोलणार काय? विलायती मूर्ति पडली! एकदां त्यानें म्हणे बसमधून जातांना गंमतच केली होती. बसमध्यें जागा नव्हती. एक अँग्लो-इंडियन मुलगी आपल्या धाकटया भावाला घेऊन चढून आली. देसाई तातडीनें उठला व त्यानें मान वाकवली. तेवढयांत पलीकडल्या बाकावरील एक म्हाताराही लगबगीनें उठला व त्यानेंही मान वाकवली. त्यामुळें दोघांचींही डोकीं एकावर एक आपटलीं! विशेषतः म्हाताऱ्याचें टक्कल चांगलेंच शेकलें. दोघांचीं डोकीं एकमेकाला टेकलेलीं असतांनाच तो अँग्लो-इंडियन मुलगा खो खो हंसत या तात्पुरत्या कमानीखालून पुढें गेला व त्यानें देसाईची जागा पटकावली.

तसेंच एकदां एका स्त्रीची मोत्यांची माळ बसमधील सीटला

अडकली. ती उठूं लागली तेव्हां देसाईनें लगेच पुढें होऊन 'अलाऊ मी' करीत तिच्या मौक्तिकमाळेला हात घातला. तिनें ऐटबाज पोषाख करणाऱ्या चोरांच्या बऱ्याच गोष्टी वाचलेल्या असाव्यात; कारण तिनें एकदम निराळाच अर्थ घेऊन " चोर–चोर ! " म्हणून पुकारा केला.

देसाईला स्त्रियांपुढें मान वाकवण्याचें तर अगदीं फार फार–म्हणजे फाजीलच वेड आहे. कोणतीही स्त्री भेटो, देसाईच्या पाठीनें काटकोण केलाच म्हणून समजावें ! एकदा या बाबतींत मीं त्याची जिरवली होती. ऑपेरा हाऊसकडे आम्ही पायरस्त्यावरून चाललों होतों; इतक्यांत रस्त्यावरून एक व्हिक्टोरिया आमच्या अगदीं जवळून गेली. माझें लक्ष आंतील मंडळीकडे नसून मी आपला थिएटरवरची सिनेमाची जाहिरात वाचीत होतों. थोड्या वेळानें वळून बघतों तों देसाई वाकलेला.

"काय रे, कांहीं पडलं कीं काय खालीं ?"

देसाई सरळ होत म्हणाला, "नाहीं. पण, तूं ती व्हिक्टोरिया नाहीं पाहिलीस, आतां गेली ती ?"

मीं दूर गेलेल्या व्हिक्टोरियाकडे व ती ओढून नेणाऱ्या जनावराकडे पाहिलें, व एकदम प्रकाश पडल्यासारखी मुद्रा करून उद्गारलों, "असं, असं ! इतक्या बारकाईनं पाहिलं नाहीं मी—**घोडी** होती म्हणतोस ?"

---

# (३) मवाली

'ता'वरून ताकभात ओळखणें, इतकेंच नाहीं तर तांतडीनें तो कालवायला सुरवात करणें ही विद्या चांगली असली तरी नुसत्या 'वि'वरून विषाचा वास घेणें व दुसऱ्याच्या संसारांत विष कालवणें हें खात्रीनें शहाण्या माणसाचें काम नाहीं. तुम्हीच विचार करा, 'वि' म्हणजे विज कशावरून नसेल ?––अन् सदोदित काळ्या चष्म्यांतून दुसऱ्याकडे पाहणाऱ्या या मूर्खांचे डोळे ती कडाडून फोडणार कशावरून नाहीं ? तेव्हां सांगायचें काय, कीं दुसऱ्याबद्दल नसते संशय घेण्यापूर्वी आगापिच्छा पाहून नीट खबरदारी घेतली पाहिजे.

परवांच पाहा ना, 'जागा पहाणें' हा माझा लेख वाचला अन् दोघांतिघांनीं माझ्याकडे पृच्छा केली कीं, "काय हो ? जागेसाठीं वणवण भटकून हैराण झालेला एक जीव– मग तो सुटांत असो वा बुटांत असो– गोलपिठ्यापाशीं घाम पुशीत बसलेला पाहून तुम्हांला म्हणे 'विलक्षण' वाटलं. पण तुम्ही स्वतः मात्र दुपारीं बारा वाजतां उन्हाचे त्या भागांत भटकत होतां. याचा खुलासा कराल काय ?"

मी म्हणालों, "असे आडून कां बोलतां ? चक्क कां सांगत नाहीं, कीं तुम्ही मवाली आहांत ?"

उठल्यासुटल्या दुसऱ्याचा संशय घेणाऱ्याचा असा राग येतो कीं नाहीं मला ! गेलों असेन मी गोलपिठ्याला; म्हणून काय लगेच मी मवाली झालों ? क्वचित् प्रसंगीं मी मवाल्यांच्या घोळक्यांतून त्यांच्या खांद्यावर हात ठेवूनही चाललेला दिसेन. पण म्हणून काय असें

म्हणायचें, कीं मी त्यांच्या गळ्यांत पडलों आहें ? कशावरून मीं त्यांची बकोटी धरून त्यांना पोलिसठाण्यावर चालवलेलें नसेल ? —किंवा, कशावरून मी त्यांच्या खांद्यावर हात ठेवून त्यांना विनवीत नसेन, कीं "बाबांनो, कां उनाडक्या करतां ? चांगलं नाहीं हें !" किंवा समजा, याच घोळक्याबरोबर मी एकादवेळ पानपट्टी चघळतांना दिसलों तर ती त्यांना असें म्हणण्यासाठीं कशावरून नसेल; कीं "मित्रांनो, पाहिलंत पान खाल्ल्यानें तोंड कसं खराब दिसतं तें ! अन् ! रस्त्यावर थुंकल्यानें रस्ताही चटकन् किती वाईट होतो हें दाखवूं तुम्हांला ?—पिच्च्."

लोक वाईट अर्थ चटकन् काढतात; चांगला नाहीं !

अन् परवांच्या माझ्या रौंदबद्दल खुलासाच पाहिजे असेल तुम्हांला तर तो हा घ्या !

प्रियवाचकांना आतां सांगणें भागच आहे कीं हल्लीं मीं 'मवाली, त्याचे मोहल्ले, महाल व महिला' हा खळबळ उडवणारा ग्रंथ लिहिण्याचें हातीं घेतलें आहे. केवळ मथळ्यांतल्या अनुप्रासांत भर घालण्यासाठीं नव्हे, तर खरोखरच पुस्तक चिकित्सक व संशोधकबुद्धीनें लिहिलेलें असल्यामुळें तें पुढेंमागें एम्. ए.च्या पदवीसाठीं सादर करण्याचा माझा विचार आहे. इतकें नाविन्यपूर्ण सामाजिक संशोधन आजपर्यंत कोणीं केलेलें नाहीं अशी माझी खात्री आहे. पहिल्या भागांत मवाल्यांची वस्ती व बाजारपेठा— जसें भेंडीबझार, मदनपुरा, महंमदअल्ली रोड, कामाठीपुरा इत्यादींचीं भडक वर्णनें देणार असून दुसऱ्यांत मवाल्यांची गृहस्थिति इतक्या कळकळीनें रंगवणार आहें कीं, स्वर्गांतून— बोल्शेव्हिकांना स्वर्ग असेल तर— गॉर्की टिपें

गाळल्याशिवाय राहणार नाहीं. सध्यां तिसऱ्या भागावर मीं विशेष भर दिलेला असून त्यासाठींच परवां त्या भागांत रौंद घातलें हें आतां निराळें सांगायला नको.

माझें पुस्तक लवकरच बाहेर पडणार आहे. आणि त्यासाठीं आतांशा मला रोज बाहेर पडावें लागतें. परवांच एकादशीची सुट्टी होती, म्हणून दाण्याचे लाडू खाऊन ढेकर देत मीं कामाठीपुऱ्यांत चक्कर मारली. अकराव्या गल्लीचा सुप्रसिद्ध दादा महामवाली मुड-दूसखान याची मुलाखत घेऊन ती पहिल्या भागांत छापणें मला आवश्यक वाटत होतें. मुडदूसला प्रथम मी गुप्त पोलिस वाटलों; म्हणून मी त्याच्या खोलींत शिरतांच दाराला कडी लावून तो बाह्या वर करणार होता. तेव्हां मीं भीत भीत सांगितलें कीं, मी मुलाखत घ्यायला आलों आहें.

"कौनसे मुलूखसे आया ?" तो गुरगुरला.

यावर मीं त्याला आपलें नांव, गांव, धंदा सगळें सांगितलें व पोलि-सशीं आपला बादरायण संबंधसुद्धां पोंचत नाहीं असें आश्वासन दिलें.

"यह अच्छी बात है" असें म्हणून त्यानें पुन्हा दार उघडलें व आसपास साध्या पोषाखांत कोणी पोलिस तर उभे नाहींत याबद्दल पाहणी करून घेतली. बाहेर उभे असलेले सर्व मवाली विचित्र पोषाखांत असल्यामुळें यासंबंधांत त्याचें समाधान झालें असावें. पुन्हा दार लावून घेऊन त्यानें मला मुलाखत म्हणजे काय असा प्रश्न केला. मीं जेव्हां त्याला सांगितलें कीं मुलाखत दिली कीं त्याचें नांव सर्वत्र छापून येईल इतकेंच नाहीं तर फोटोही जिकडे तिकडे प्रसिद्ध होईल, तेव्हां त्यानें एकदम उडी मारून माझा गळा दाबला.



दहा मिनिटांनीं मी शुद्धीवर आलों तेव्हां तो मला गांवठी ब्रॅण्डी पाजीत होता.

दहा मिनिटांनीं मी शुद्धीवर आलों तेव्हां तो मला गांवठी ब्रॅण्डी पाजीत होता. "क्यौं मास्तर, अब तबिय्यत कैसी है ?" मीं सांगितलें कीं, आराम आहे; आणि पुन्हा विराम पावणार होतों, पण तितक्यांत दारूचा घोट घशांत उतरल्यानें शुद्धीवर आलों. या वेळेस मुडदूस-खान माझ्याशीं फार गोड शब्द बोलला. आपली जीवनकथा अवश्य प्रसिद्ध करावी, त्याला कांहीं हरकत नाहीं, कामाठीपुऱ्यांत आपले शेंकडों अनुयायी आहेत त्यांना ती वाचून गुदगुल्या होतील; पण आपला फोटो व नांव मात्र प्रसिद्ध करणें आपणांस पसंत नाहीं असें त्यानें बजावून सांगितलें.

मला गहिंवरून आलें. आपलें काम अविश्रान्त, अविरत कर-णारीं पण प्रसिद्धीची मात्र बिलकूल हांव न धरणारीं अशीं मुड-दूसखानासारखीं माणसें हाताच्या बोटांवर मोजण्याइतकीं तरी सांप-डतील का ?

एवढें झाल्यावर मुडदूसनें माझ्यासाठीं 'छोटा खाना' शेजारच्या हॉटेलांतून आणून माझ्यापुढें ठेवला. तीन जाड रोट व कसलेंसें कालवण होतें. "इसमें मुरगी मटन नहीं है," त्यानें माझी खात्री केली, "बम्मन लोगबी खाते है." तरी पण मीं हात जोडून त्याला सांगि-तलें कीं, उपास असल्यामुळें मला तें खातां येत नाहीं. त्याचबरो-बर त्याचें उदार मन दुखूं नये म्हणून डबल कप चहा मी जरूर पिईन असेंही म्हटलें.

"उपास !" तो मला चहा पाजून तुच्छतेनें म्हणाला, "तुम् ऐसेहि भूखे भूखे मरनेवाले आदमी है. हमारा मामला देखो. मटन, सागुती खाके खाके ऐसी सुरत बढाते है. खालीपिली दादा नहीं

बना !—आज हमारी ताकद इतनी है, कि एक ताली तो बजाना चाहिये, पच्चास आदमी दौडकर आयेंगे और तुमारा मुड्दा पडेगा !"

"त्याबद्दल वाद नाहीं." अंगावर शहारे येऊन मी शुद्ध मराठींत म्हणालों.

नंतर मुडदूसखानानें आपली कहाणी सांगितली. मीं ऐकून घेतली, हस्तांदोलन केलें व मनगटाचीं निखळलेलीं हाडें नीट करीत त्याच्या घराबाहेर पाऊल टाकलें. म्युनिसिपल वर्कशॉपपाशीं जाऊन पोंचेपर्यंत मुडदूस माझ्याकडे संशयी नजरेनें पहात होताच. परत येतांना कुटुंबासाठीं जरीचें लुगडें घ्यायचें होतें तें मात्र घेतलें नाहीं. म्हणजे असें कीं, गेलों होतों शहाड्यांच्या दुकानांत पण आयत्या वेळेस खिशांत हात घालतां पाकीट परागंदा झाल्याचें लक्षांत आलें !

संध्याकाळीं सौभाग्यवतीला मुलाखतीची हकीगत सांगितली (अर्थात् पाकिटाबद्दलचें वगळून) अन् लुगडें मात्र आणायचें 'राहून गेलें' असें म्हटलें. त्यामुळें बावळटपणाबद्दल उद्धार होण्याचा टळला खरा, पण विसराळूपणाबद्दल मात्र कान उपटले गेले. असो; तें नेहमींचेंच आहे. सांगायचा मुद्दा काय कीं, मुलाखतीविषयीं मात्र तिनें माझें भरपूर अभिनंदन केलें व मुडदूसच काय पण सवाई मुडदुसाची मुलाखत अवश्य घेत जा अशी तिनें सूचना केली. मला यांत फाजील उत्साहाचा वास आला नी त्याचें कारणही लवकरच समजलें. सौभाग्यवतीची सात्त्विक इच्छा एवढीच होती कीं मी असा मवाल्यांच्या वस्तींतून हिंडलों म्हणजे तरी मला थोडीशी अक्कल-

हुशारी व दोन खाऊन चार देण्याची ताकद येईल. आजच पहाना, सहीसलामत अगदीं पाकीट सुद्धां न गमावतां कसा परत आलों !

यावर मीं हळूच डोळे मिचकावले. अक्कलहुशारी तरी मीं या वेळीं दाखवली होती यांत शंका नाहीं.

सौभाग्यवतीच्या प्रोत्साहनानें माझा हुरूप आणखीनच वाढला अन् तिसऱ्या भागांत घालण्यासाठीं 'मवाली महिले'ची मुलाखत आणण्याचा मीं निश्चय केला. पण या वेळीं मात्र तिनें तो हाणून पाडला. कारण तिचें म्हणणें असें कीं, विषाची परीक्षा पहावीच कशाला ? नदींत पूल घालतां येईल कीं नाहीं हें पहाण्यासाठीं एक गृहस्थ नदींत उतरला अन् लोंढ्याबरोबर वाहून गेला; तशागत व्हायचें. यावर मीं म्हटलें, "प्रत्यक्ष मुलाखत दिल्याशिवाय त्यांत सत्याची झांक कशी मारेल ?" तेव्हां ती म्हणाली, "झक् मारतं तें सत्य."

या उत्तरानें मला जोर आला. मी ओरडलों, "हेंच–हेंच ! हेंच तर सांगत असतों मी. सत्य नकोच असतं तुम्हां लोकांना ! समाज म्हणजे सगळा भोंदू लोकांचा बाजार. सत्याला तोंड द्यायची कुठून त्यांची तयारी असणार ?—का हो. तुम्हींच ना परवां तें वाचून दाखवलंत, स्त्री नी पुरुष हीं एकाच रथाचीं दोन चाकं आहेत ? त्यांतलं एक काढून ठेवूं म्हटल्यानें कसं चालेल ? अन् मवाली झाले तरी त्यांना काय बायका नसतात ?"

"कोणत्या बायका म्हणतां तुम्ही तेंच मला बरोबर समजत नाहीं." सौभाग्यवती बारीक नजरेनें माझ्याकडे पाहत म्हणाली. "त्या हलकट चालीच्या म्हणत असाल––"

"हलकट चालीच्या !" मीं किंचाळलों. "त्यांना हलकट म्हणणारी तूं कोण नी मी तरी कोण ? विचारला आहेस का हा प्रश्न तूं स्वतःला ? बोल, विचारला आहेस का ? पापाच्या गर्तेत कुणीं लोटलं या बायांना ?—बोल, कुणीं लोटलं ?—ढोंगी, लबाड, दांभिक, काळ्याकुट्ट, उलट्या काळजाच्या—"

पण तिनें माझें वाक्य पुरें ऐकून न घेतांच चपक्‌दिशीं तव्यावरची भाकरी उलटली व "अरे गणू, दोन कोळसे टाक रे आणून यांत" असें फर्मावलें. सौभाग्यवतीची ही रीतच आहे. उत्तर सुचेनासें झालें नी पड खायची वेळ आली म्हणजे शक्य तितका मोठा आवाज काढून मला शह द्यायचा, मोठ्या माशानें झिंग्याला गिळावें तसा माझा आवाज त्यांत केव्हांच लोपून जायचा नी मग बाईसाहेबांनीं दिमाख मिरवायचा !

असो. उगाच गृहकलह वाढूं नये म्हणून मग मीं तो बेत बाजूस ठेवला.

अर्थात् समाजाच्या दृष्टीनें मवाली कितीही भयंकर माणूस असला तरी दंग्याच्या दिवसांत त्याचा आपल्याला— तो आपल्या जातीचा असेल तर— उपयोग झाल्याशिवाय राहात नाहीं. खेतवाडींत शंकऱ्या घाटी म्हणजे जसा गल्लीचा दादा, तसे डोंके वकील (बोगस) हे एकप्रकारें गल्लीचे 'भाऊ'च आहेत. दंगा सुरू झाला कीं ते आपले शंकऱ्याशीं करार करून टाकतात : "जर टग्यासारखा वागून गल्ली संभाळशील तर पुढें दंग्याच्या खटल्यांत मी तुझा फुकट बचाव करीन." क्वॅक डॉक्टर इंगळे असेच फुकट दवापाण्याचा करार करीत. पण यांनीं एकदां तो पाळला नाहीं वाटतें ! तेव्हां दुसऱ्या दंग्याच्या वेळीं

लोक त्यांच्याशीं करार करण्याच्या भानगडींतच पडले नाहींत. आपलेंच घर समजून त्यांनीं दवाखाना लुटून नेला.

आमच्या रंगरावाचा साहेबी पोषाख दंग्यांत त्याच्या उपयोगीं पडतो हें पाहिल्यावर आमचे भिकूभटजीही एकदां सन् हॅट घालून भेंडीबझारांत गेले होते. पण वारा येऊन हॅट उडाली व भटजींची झुपकेदार शेंडी डौलानें फडकूं लागली. नंतर भिकूभटजी एक आठवड्यानें इस्पितळाबाहेर आले.

अलीकडे तर 'मवाली' शब्दाला शिवीचें स्वरूप प्राप्त झालें आहे. ज्याप्रमाणें दोन पायांच्या माणसाला बिनदिक्कत वाटेल तेव्हां 'गाढव' म्हणावें त्याप्रमाणें सुटाबुटांतल्या सभ्य माणसालाही खुशाल 'मवाली' म्हणावें, असे हे दिवस आहेत.

माझा पोषाख साधारण बऱ्यापैकीं असतो. पण एकदां धोबी वेळेवर आला नाहीं म्हणून किंचित् गबाळे कपडे घालून मला कोर्टांत जावें लागलें. वाटेंत रंगराव भेटला व तोंडांतली सिगरेट काढून ती दोन बोटांत धरून भुंवया उंचावून म्हणाला, "काय, मवाली दिसतोस रे !"

मला ती शिवी फार लागल्यामुळें दुसऱ्या दिवशीं मीं अगदीं झकपक सूट केला व केंसबीस विंचरून फिरायला गेलों. वाटेंत कोपरकर वकील भेटले व आश्चर्यानें म्हणाले, "किती चापून केंस बसवलेत हो ?—एकाद्या मवाल्यासारखे !"

यामुळें होतें काय, वैताग येऊन जर्मनींतला तो नग्नसंघ बरा वाटतो. आमच्या ऑफिसांतले परचुरे मात्र टीकेला गांगरून न जातां फार लक्षपूर्वक आपला पोशाख करतात. केंस चांगले विंचरतील,

चोपूनही बसवणार नाहींत किंवा झुलपेंही काढणार नाहींत. सूट कोरा करकरीत असेल तर बग्याला सांगून पाठीवर शाईचे दोन ठिपके उडवून घेतील. बुटांना रोज पॉलिश लावतील पण नंतर कुटुंबाकडून त्यावर राखेचा बोळा फिरवून घेतील.—आपल्याच्यानें नाहीं व्हायचें एवढें सगळें !

मध्यंतरीं तर 'मवाली' शब्द कॉलेज विद्यार्थ्यांत इतका लोकप्रिय झाला होता कीं अगदीं विचारूं नका. 'हॅलो, मवाली'पासून जी सुरवात व्हायची ती अधूनमधून त्या शब्दाची भरपूर पेरणी झाल्यावर 'गुड नाइट, मवाली'नें शेवट व्हायचा. या लाडक्या संबोधनाचें लोण वहात वहात आमच्या घरींही येऊन पोंचल्याचें मला पक्कें आठवतें. आमचा छोटू—आठ एक महिन्यांचा असेल. 'स्त्री' मासिक नियमित वाचणारी सौभाग्यवती त्याला कधीं कधीं 'माझं फूल आहे तें', 'माझी कळी आहे ती—', 'माझी आशा ग बाई—' किंवा 'बघितलेत हंसरे डोळे ? —उमललेली पाकळी ?' वगैरे उद्गार काढते व मी उत्तर देतों, 'मला तर तें एक मुटकुळं दिसतंय् !' —हातां-पायांना झटके देत गोधडीवर पडला होता. इतक्यांत गोदी आली व कौतुकानें म्हणाली, "पाहिलंत बाबा, कसा मवाली दिसतो तो !"

"खबरदार कुणाला मवाली म्हणशील तर !" मी ओरडलों व ती पळाल्यावर चुकून मनांत बोलून गेलों, "मवाली कुठची !"

या मवाली-युगांतील एक दिवस. वांद्र्याहून लोकलनें मुंबईला निघालों होतों. समोरच्या बांकावर एक पगडी घातलेला सभ्य दक्षिणी गृहस्थ बसलेला असून त्याच्या शेजारीं 'मराठी भाषेची घटना', चिपळूणकरांची निबंधमाला व एक जाडा व्याकरणकोश पडलेला होता

व फाउंटन पेननें तो एका कागदावर कांहीं तरी लिहीत होता. इतक्यांत तें पेन त्याच्या हातून खालीं पडलें. मीं चट्दिशीं उचलून तें त्याच्या हातांत दिलें. पण तेवढ्यांत पेनवर सुंदर कोरून लिहिलेलीं M. W. L. हीं इंग्रजी अक्षरें मला दिसल्याशिवाय राहिलीं नाहींत. तेव्हां कुतूहलानें मीं विचारलेंच त्याला :—

"आपण तर मराठीचे अभिमानी दिसतां; मग—माफ करा मला, पण— या झरणीवर नांव घालतांना इंग्रजी आद्याक्षरांचासा उपयोग केलात ?"

पेन घेऊन तो गृहस्थ विमनस्कतेनें म्हणाला, "माझं नांव आपल्याला ठाऊक असतं तर हा खुळचट प्रश्न आपण केला नसता."

"काय नांव आपलं ?"

गृहस्थ खिडकीबाहेर पहात उत्तरला,

"महादेव वामन लिखिते."

# (४) खरेदी

मॅजेस्टिक सिनेमावरून रपेट करीत असतांना परवां एक चमत्कार पाहिला. खाकी कागदांत गुंडाळलेल्या पांचपंचवीस कागदी पेट्या, हरि पांडुरंग लेले या ढोबळ अक्षरांत मिरवणारीं दोनतीन नव्या लुगड्यांचीं बोचकीं, कळीची मोटार व कचकड्याच्या बाहुल्या अन् लहानी-बाई धुरंधर यांचीं विणकामाचीं पुस्तकें (नवी आवृत्ति) इतक्या वस्तूंचा एक लहानसा डोंगर एकसमयावच्छेदेंकरून व हळुहळू पायरस्त्यावरून पुढें सरकत होता. कांहीं अंतरावरून आपली उंची जरीची शाल सावरीत व मध्येंच एका हातानें अंबाड्यांतील शेवंतीची वेणी सारखी करीत एक एक पाऊल हंसगतीनें टाकणाऱ्या सुंद्राताई माझ्या दृष्टीस पडल्या व तावडतोब मागून येणारा डोंगर कोणाच्या मालकीचा आहे हें मीं ओळखलें. तेवढ्यांत शेजारच्या हॉटेलांतून एक पोरगें कप वाजवीत बाहेर पडलें व त्यानें उपरोक्त डोंगराला धक्की दिली. दुसऱ्याच क्षणीं सबंध पायरस्त्यावर कागदी पेट्यांचा व पार्सलांचा सडा पडला व एकंदर वातावरणाला मध्यरात्रीच्या लोहार स्ट्रीटची शोभा आली.

"काय सुंद्राबाई, इकडे कुणीकडे?" असा मीं प्रश्न केला होता व त्याला मौक्तिकमाळेसारखें तेजस्वी हास्य करून सुंद्राताई उत्तर देणार होत्या, इतक्यांत वरील प्रकार घडला व त्यामुळें हंसण्यासाठीं बाहेर काढलेल्या दांतांनीं त्यांनीं आपला अधर दाबला व दोन्ही हात एकांत एक अडकवून लॅरेलकडे जसा हार्डी बघतो तशा त्या पति-राजांकडे पाहूं लागल्या.

बिचाऱ्या वामनरावांची मुद्रा अपराध्यासारखी झाली होती. त्यांच्या डोक्यावरचे केसही चक्क लॉरेलपद्धतीनें वर उभे राहून पुन्हा खालीं पडत होते व त्यांचे डोळे मिच मिच करीत होते.

डोंगर पोखरून उंदीर का होईना, पण तो निघाला हें पाहून लोकांना थोडा वेळ गंमत वाटली. वामनराव व सुंद्राताई यांच्याकडे त्यांनीं आळीपाळीनें बघितलें. नंतर कांहीं लोक मनगटावरचें घड्याळ पाहून निराशेचा सुस्कारा टाकून पुढें चालते झाले तर कांहीं 'चिकट' लोकांनीं शेवटपर्यंत सिनेमा पहाण्याचा निश्चय करून लगोलग त्याच ठिकाणीं मुक्काम उभारला आणि वेळ जाण्यासाठीं दुय्यम करमणूक म्हणून मसाल्याची पट्टी व पिवळा हत्ती यांची ऑर्डर दिली.

सुमारें दीड मिनिट अशा रीतीनें गेल्यावर सुंद्राताई म्हणाल्या, "आतां उरलेलीं बाक्सं वेचणार आहांत कीं असेच उभे राहणार पंढरीच्या रायासारखे ?"

त्यांनीं 'उरलेलीं' हा शब्द वापरण्याचें कारण माझ्या तेव्हांच लक्षांत आलें. 'रस्त्यांत कचरा करणें चांगलें नाहीं' हा म्युनिसिपालिटीचा उपदेश तंतोतंत अंमलांत आणण्याच्या उद्देशानें तमासगिरांपैकीं कांहींनीं वरीलपैकीं बरींच 'बाक्सें' उचलून वामनरावांनीं बिघडवलेलें मुंबईचें आरोग्य सुधारलें होतें.

"सदांचंच आहे तें," माझ्याकडे वळून सुंद्राताई उद्गारल्या, "एक जिन्नस मेला नीट धरतां येईल तर शपथ! तरी बरं, गाडी करायचीच होती आत्तां; पण क्षणाचा धीर निघेल तर ना!....मेलं कधीं कधीं असं वाटतं, नको तो बाजार नी नको ती पीडा."

वामनराव माझ्या कानांत पुटपुटले, "माझं तरी तेंच म्हणणं आहे."

खरेदी म्हटली कीं माझ्या अंगावर कांटा उभा राहतो. एरवीं पायपीट करण्यांत माझा कुणी हात धरणार नाहीं. कधीं कधीं संशयास्पद भटकण्यावरून पोलिस धरील तेवढाच. पण 'अमुक आणा' म्हणून कुटुंबाचें फर्मान सुटलें कीं आपलें बुवा पाऊल उचलत नाहीं. अर्थात् शेवटीं झक्कत पिशव्या घेऊन 'एक दोन' करीत जावें लागतें ही गोष्ट निराळी. पण 'आंतल्या आवाजाची' कुरकूर थोडीच थांबणार आहे? अखेर वाटेंतल्या इराण्याकडे सोडा पितों तेव्हां बरें वाटतें.

माझी नेहमींची तक्रार ही, कीं एवढा जिवाचा आटा करायला सांगितलाय् कुणीं? त्यापेक्षां पहिल्या तारखेला एक यादी वाण्याकडे, दुसरी कापडवाल्याकडे, तिसरी लोणाऱ्याकडे नी चवथी 'स्टोर' वाल्याकडे भिरकावून द्यावी अन् आपण खुशाल आरामखुर्चीत बिड्या फुंकीत पडावें ना! मग तो वाणी आहे नी त्या याद्या आहेत. रोज रोज बाजार करून आजारी कां पडायचें आहे? ती कोटटोपी घाला कुणीं, ते जोडे चढवा कुणीं? त्या झोळया अडकवा कुणीं, ते भाव विचारा कुणीं अन् तें चिमटींत पीठ-मीठ-साखर धरून नसलेला शहाणपणा आपल्या बारीक डोळ्यांत आणून गंभीरपणें टीका करा कुणीं? पण छे! आमच्या बाईसाहेबांना हें पटेल तेव्हां ना? एक तर तिचा वाण्यावर विश्वास नाहीं. आणि दुसरें असें, कीं माझ्यावर विश्वास नाहीं. महिन्याचा माल एकदम मागवल्यानें वाणी गचाळ माल पदरांत बांधील नी मग पदरानें नाक धरून आपल्याला तो पत करावा लागेल, असें तिचें म्हणणें. बरें, मला बाजारांत धाडायचा, तरी मी माल चांगला आणीन अशी स्वारीला खात्री नसते. मला

खरेदीला पिटाळण्यांत माझ्या अकलेंत थोडी भर पडावी हाच तिचा उदात्त हेतु असतो हें निराळें सांगायला नकोच.

"........घटकाभर गेलांत दुकानांत रोज सकाळीं तर काय झालं, म्हणल्यें मी ? माणसाला व्यवहार तरी शिकायला नको का ? आतां एवढं वय झालं (या ठिकाणीं दर वेळीं जरूर तो महिना व आठवडा मिळवून तयार ठेवण्यांत सौ. मोठी पटाईत आहे) पण हुषारीच्या बाबतींत सांबाची मूर्ति असायचं. मी म्हणल्यें, आपलं एक जाऊं द्या. आज उद्यां सोनापुरांत जायचींच लाकडं. पण या पोरांकडे नको का पहायला ? त्यांना थोडं जगाचं ज्ञान नको का द्यायला ? असलाच कित्ता जर त्यांच्यापुढं ठेवला तर कशीं करतील तीं ?

तें कांहीं नाहीं. तुम्ही गोदीला नी गुंड्यालाही जा घेऊन बरोबर ! (कोर्टाच्या निकालाविरुद्ध ब्र काढला कीं शिक्षेंत भर पडते ती अशी !) सकाळच्या प्रहरीं चुलीपाशीं कटकट करीत बसतात त्यापक्षीं दुकानांत तरी रमतील. आपल्यालाही अंमळ मोकळं वाटेल" इत्यादि इत्यादि.

अन् मला संताप येतो तो या शेवटच्या वाक्याचा. आमच्या बायकांत एक संसाराचा खेळखंडोबा करण्याखेरीज बाकी खिलाडू वृत्ति नाहीं हेंच खरें. म्हणजे असं पाहा, फंडगुंडाप्रमाणें खांद्याला झोळ्या अडकवून एकाद्याला गचांडी तर द्यायचीच, शिवाय दोन्ही हात मोकळे राहूं नयेत म्हणून गोदी गुंड्यासारख्या जळवा दोन्ही बाजूंनीं डसवायच्या....अन् वर दांत काढून म्हणायचें, तुम्हांला मोकळं वाटेल ! अन् काय म्हणे व्यायाम होईल थोडासा. मॅक्फॅड्नच पडली कीं नाहीं मला व्यायाम शिकवायला !

बाकी या एकंदर समारंभामुळें अनुक्रमें कान, डोकें, हात, पाय यांना रगडून व्यायाम घडतो यांत शंकाच नाहीं. त्यांतून गुंडू-गोदीला बरोबर नेणें म्हणजे डम्बेल्सची जोडी फिरविण्यासारखें आहे. उपमा चुकलीच थोडीशी, कारण एकसारखें "बाबा, हें असं हो कसं? तें तसं हो कसं? सफरचन्द घ्या, बाबा. पिशवीला भोंक पडलं, बाबा........अमुक बाबा नी तमुक बाबा........" करीत माझी पाठ पुरवण्याऱ्या गुंडूला नारोशंकरी घंटा म्हणणें अधिक शोभून दिसेल. गोदीचा नमुना एक निराळाच. गुंडू फक्त माझ्या हातांना झटके देऊन खांद्यांचीं हाडें वेगवेगळीं करण्यांतच रमतो. क्वचित् प्रसंगीं हातांवर तुरी देऊन गल्ल्यांकुच्यांतून पसारही होतो. पण तो हाडाचा डॅम्बिस तरी नाहीं. गोदू पोरगी मोठी पाताळयंत्री! गुंडूच्या शोधार्थ मीं गल्लीचें वळण घेतलें कीं ती जी एकाद्या दुकानांत शिरते ती मी गुंडूला घेऊन धांपा टाकीत परत येई तों पेन्सिली, उमटायचीं चित्रें, टोंक करायचें यंत्र व रंगाच्या कांड्या इत्यादि निवडक मालाची रास तयार ठेवून शिवाय तोंडांत चॉकलेट चघळीत असते.

बरें, वाटेंत या कुलदीपकांचा कांहीं उपयोग होईल म्हणावें तर त्याही नांवानें उजेड! झोळी चांगली असेल तर हातांत धरायला गोदीची एरवीं हरकत नसते. तिचें म्हणणें एवढेंच कीं चप्पलच्या रंगाशीं झोळीचा रंग मॅच झाला पाहिजे. हें तिचें अजब बोलणें ऐकलें कीं बायकामुलांना घेऊन उपनगराच्याही पलीकडे राहणारा मी थक्कच होतों.

गुंडूच्या हातांत पिशवी द्यावी म्हणावें तर तो ती एकदां या

खांद्यावर व एकदां त्या खांद्यावर अशा ऐटबाजपणें फेकील कीं त्यामुळें आसपासच्या उनाडटप्पूंनीं रस्त्यावर पसरलेलीं बोरें–पेरू तोंडांत घालून पाहतच राहावें! शिवाय गुंडूची पिशवी नेहमींच खुल्या तोंडाची असल्यानें गोमाता त्याच्यावर नेहमीं खूष असते. त्यामुळें एक पांच वर्षांचें पोर भाजीची झोळी घेऊन जातांना दिसलें व मागून दोन तीन गाई आस्तेकदम येत असल्या तर ही मिरवणूक गोरक्षण-वाल्यांची नसून मार्केटिंग करून चाललेल्या गुंडूची आहे असें निखा-लस समजावें.

भोंकाची पिशवी गुंडूजवळ देण्यांत तर मुळींच फायदा नसतो. कारण तो नेमका पिशवींत जांभळें अगोदर भरून वरतीं भोपळयाच्या फोडी व कोबीचा गठ्ठा ठेवील व रस्त्यांत जांभळांचा पाऊस पाडील; अन् मग 'गारा' वेंचतांना मला नाकीं नऊ येतील. बरें, हा पाऊस अव्याहत असल्यानें जबर चिकाटी धरून पहिलें जांभूळ कुठें पडलें असेल याचा शोध लावूं म्हणावें तर तेंही शक्य नसतें. कारण शोध फक्त बियांचा लागतो!

एकदां मुंबईहून येतांना मीं अर्धा मण सुका मेवा, शर्टाचें कापड, धोतरें, टोप्या, आरसा अन् सुंदरदासची छानदार खुर्ची खरेदी केली. पैसे चुकते केल्यावर प्रश्न आला, कीं एवढें सामान वांद्रयाला कसें न्यायचें? तेव्हां टाळी वाजवूनही व्हिक्टोरिया येईना म्हणून जवळच उभी असलेली टॅक्सी ठरवून चर्नीरोडला गेलों. हमालाकडून सामान उतरवून बी. बीं. त बसून वांद्रयाला उतरून सामान हमालाकडून काढवून गाडींत चढवलें व घरीं गेल्यावर उतरवून हाशहूश् करीत बालगोपालांना थोडा वेळ उड्या मारायला लावल्या. पण हा आनंद

क्षणिक आहे याची सूचना धाड्धाड् उडणारी छाती व कपाळावर आलेला घाम मला देत होताच. अन् ती भीति खरीही ठरली. पंधराएक मिनिटांनीं संकटें येण्यास सुरवात झाली. खुर्चीवर उभें राहून कवाईत करतांना पडून गोदीचा दांत मोडला, गुंडूच्या घशांत अक्रोडाचें साल अडकलें, सौभाग्यवतीनें मला आणणावळीचा खर्च किती झाला म्हणून प्रश्न केला. आंकडा कळल्यानंतर अर्थातच माझी अक्कल कायसें खायला गेली होती कीं काय म्हणून विचारण्यांत आलें व मुंबईहूनच तडक गाडी करून आलों असतों तर काय बिघाडलें असतें म्हणून प्रश्न केला गेला. "बिघडायचं राहिलंय् काय ?" मीं दांतओठ खाऊन मनांत म्हटलें.

बरें, एकदां असेंच किरकोळ पण भरपूर सामान घेऊन तें व्हिक्टोरियांत भरलें व स्वतःला बसायला जरा प्रशस्त असावें म्हणून गाडीवाल्याजवळ उच्चासनावर बसलों. वाटेंत धांवत मागें आलेल्या हमालाला नुसती चुटकी वाजवून बरोबर येण्यास सुनावलें. नंतर सहज मागें वळून पाहिलें. तों दोन्ही हात पुडक्यांच्या राशीवर टाकून व पाय पुढच्या सीटवर ठेवून तो गाडींत वामकुक्षी घेत पडला होता.

'गरीब बिचारा!' मीं मनांत म्हटलें व नंतर घरीं पोंचेपर्यंत साम्यवाद आणि 'मासेस्' यांचा विचार करण्यांत दंग झालों. घरी पोंचतांच उतरून बघतों तों सीटवर कागदांत घडी केलेले मासे दिसले व ब्राह्मण एक पाऊल मागें सरकला. नंतर चकित होऊन आणिक एक पाऊल मागें सरकला. कारण माशांखेरीज गाडींत दुसरें कांहींच

दिसेना. हमाल तर नव्हताच, पण मीं घेतलेल्या सामानापैकीं एकही पुडी शिल्लक नव्हती. डोकें खाजवतों आहें, इतक्यांत गाडीवाल्यानें खालीं उतरून माझ्याकडून भाडें घेतलें व "इन्शाल्ला!....तो मै इधरही मच्छी भूला था" असें म्हणून ते मासे उचलले व गाडी दामटली. पुढें माझी काय दामटी वळली असेल तें सांगायला नकोच. एवढेंच खरें, कीं तेव्हांपासून मीं 'मासेस्'चा विचार करण्याचें सोडलें.

पण ही झाली वाण्याची अन् भाजीची खेरदी. जेव्हां पोलक्याचें कापड नी लुगडीं घ्यायचीं असतात तेव्हां आमची काय धिंडका निघते ती विचारूंच नका. इतकी नाजूक खेरदी माझ्या एकट्यावर सोपवण्यास ती तयार नसल्यानें गुंडू, गोदी, ती व मी लोकलनें चर्नीरोडला जातों अन् गिरगांव नाक्यापासून आस्तेकदम लेले, शहाडे, म्हसकर अशीं स्टेशनें करीत करीत सूर्य बुडायच्या सुमारास मंगळदास मार्केटांत पोंचतों. तरी लुगड्यांना पत्ता नसतोच. गुंडू-गोदीचे हात मात्र एव्हाना कचकड्याचीं खेळणीं, पत्र्याचीं विमानें, दाणे टिपणाऱ्या कोंबड्या, बॅट, चेंडू व पेपरमिंट यांनीं बरबटलेले असतात. माझ्याजवळ अर्थातच 'बरी दिसतेय् बाई' अशा वर्णनाची एकादी किसणी, 'बटाट्यांना होईल' असें शिंकें, अन् 'कित्ती दिवस मनांत होतं' असा एकादा टॉयलेटचा आरसा लादलेला असून हमाल आतां ठरवूं, मग ठरवूं अशी माझी चुळबूळ चाललेली असते. तेवढ्यांत पुन्हा शहाड्यांकडे जाण्याची लहर येऊन गिरगांवांत ट्रॅम आणून पोंचवते व तिथून 'हें तर मेलं स्टेशन' इतकें जवळ असल्यानें हमालाची 'गरज' उरत नाहीं.



'हें तर मेलं स्टेशन," इतकें जवळ असल्यानें हमालाची गरजच उरत नाहीं !

एकदां असाच सामुदायिक खरेदीसाठीं सहकुटुंब सहपरिवार निघालों. घराला टाळें मारलें. मुंबईंत पायपीट, ट्रॅमसीट करीत बऱ्याच जिनसा खरीदल्या. सिनेमा वगैरे पाहून सगळें होईतों रात्रीचे साडेअकरा वाजायला आले. परत जावें तरी त्रास अन् एकाद्याच्या घरीं जाऊन रात्र काढावी म्हटलें तरी तें अशक्य. कारण आमची फलटण पाहून व सामानाचे हारे बघून त्यांचे डोळे फाटायचे व बिचाऱ्यांचा जन्माचा निद्रानाश व्हायचा ! शेवटीं गेलों बिचारे तगमगत वांद्रयाला. आमच्या घराजवळचीं पाण्याचीं डबकीं काळोखांत कशींतरी चुकवीत व्हिक्टोरियांतलें सामान बिऱ्हाडांत नेऊन ठेवलें, पेंगलेल्या गोदू-गुंडूंना त्यांचे शिव्याशाप खात गादीवर नेऊन निजवलें व शेवटीं अगदींच पेकाट मोडल्यामुळें दोघेंही भिंतीला टेकून कपाळाला हात लावून बसलो. तीन एक मिनिटांनीं सौभाग्यवती म्हणाली, 'थोडी कॉफी करून पिऊं या का ? म्हणजे हुशारी येईल !'

"जरूर." मी उत्तरलों व लगेच उभा राहून खिडकीजवळ गेलों. बाहेर एकाददुसऱ्या दिव्याखेरीज सारा अंधार अंधार होता. सर्वत्र निजानीज झाली होती. मला मात्र नुसत्या कॉफीच्या कल्पनेनेंच इतकी हुशारी आली होती, कीं त्याच दिवशीं ऐकलेलें सिनेमांतलें गाणेंही गुणगुणण्यास मीं सुरवात केली. 'पोरं उठतील, रेकलांत असे तर' असें सौभाग्यवतीनें सुनावलें नसतें तर मी तीन चार कडवीं सहज म्हटलीं असतीं. पण माझ्या नशिबांत त्या रात्रीं गाणें नसून रडगाणेंच होतें. कारण नुकताच खरेदी केलेला एच्. एम्. व्ही.चा ग्रामोफोन, दोन सुंदर गालिचे, चारपांच लठ्ठ उशा, शेव्हिंग मिरर, गुंडूचा मेकॅनोचा व

गोदूचा विणकामाचा सेट इत्यादि वस्तूंवर सकौतुक व सप्रेम नजर मी टाकीत आहें तों सौभाग्यवती एकदम किंचाळली, "अगबाई ! सगळंच मुसळ केरांत—"

"काय झालं ?"

"कॉफी कशी करणार ? आगपेट्या आणायच्या राहिल्या !"

---

# (५) ट्रॅम-लोकल—बस

किल्येक शहाणे सांगतात, कीं चालत्या ट्रॅममध्यें सफाईनें झेप टाकून चढणें ही एक कला आहे. असेल. पण असल्या अंगलटीं येणाऱ्या कला मला पसंत नाहींत. अन् कलेची व्याख्या अशा रीतीनें तुम्हांला वाढवायचींच असेल तर तुम्ही उद्यां असेंही कशावरून म्हण-णार नाहीं, कीं खून करून तो पचवणें ही एक कला आहे ?

तिगस्तांच ट्रॅममधून उतरतांना माझें कलावन्त शरीर थोडें कलतें झालें अन् माझी ही कला व जीवन यांचा एकदमच होणारा अंत थोडक्यांत टळला. तेव्हांपासून चालत्या वाहनांत अगर वाहनांतून जाणूनबुजून उडी घ्यायची नाहीं असा मीं कानाला खडा लावून घेतला आहे. तो इतका, कीं आतांशा ट्रॅम पकडावयाची झाली म्हणजे मी तिच्या चाकांकडे टक लावून पहात बसतों—म्हणजे उभा राहतों. त्यांची गरगर पुरती थांबली म्हणजे देवळाच्या पवित्र गाभाऱ्यांत पाऊल टाकणाऱ्या भक्ताप्रमाणें गंभीरपणें टामरेल्वींत पदार्पण करतों व एवढ्या अवकाशांत तिनें प्रस्थान केलें असल्यानें अवसान गळून खालीं पडतों. पण तें कांहीं असो; जिवाची तगमग करून ट्रॅमच्या रुळांवर कायमचें पडण्यापेक्षां क्षणभर तिच्या प्रवेशद्वारांत पडलेलें कांहीं वाईट नाहीं. उठल्याबरोबर हाशहुश् करीत बाहेरच्या बाकावर बसतां येतें.

बाकी खरें विचाराल तर धांवत्याच कशाला ?—चांगल्या स्थिर, थांबलेल्या ट्रॅममध्यें—अन् तसेंच म्हटलें तर ट्रॅममध्यें कशाला !

ऑम्नीबसमध्यें, रेल्वेंत अगर कोठल्याही सार्वजनिक वाहनांत– शरीर भिरकावण्याचा मला भारी कंटाळा आहे. त्यापेक्षां तेंच शरीर या वाहनांच्या खालीं भिरकावलेलें काय वाईट, असें कधीं कधीं मनांत आल्यावांचून राहात नाहीं. वांद्र्याला राहायचें म्हणजे थोडी का कटकट आहे ? पावणेनऊ वाजतांच सौभाग्यवतीनें आदळलेली न्याहारी वाकडें तोंड करीत घशाखालीं उतरवावी लागते. अथात् ताटवाटी हलक्या हातानें न ठेवतां माझ्यापुढें आपटण्यांत व शास्त्रशुद्ध सरळ तोंड न करतां घाईघाईनें वेडेंवाकडें तोंड करून तें खाण्यांत तिचा व माझा दोघांचाही वेळ वांचविण हा एकच हेतु असतो. चूळ भरून होते न होते तों चार कपडे अंगांत चढवून चार मुक्तहस्तानें खोलींत फेकायचे, आपला जिना उतरून बी बी. चा चढायचा नी शेवटपर्यंत वेळ न सांपडल्यानें ऑफिसांत दिडकीची सुपारी मागवून ती चघळीत माकडासारखें सगळ्यांकडे बघायचें. तुम्हीच सांगा, या सगळ्या चेष्टा वांदरांना शोभण्यासारख्या नाहींत का ? सौभाग्यवतीला हें सांगितलें म्हणजे ती म्हणते, "खरं आहे. फक्त वांदरांनाच शोभण्यासारख्या आहेत."

कारण तिचें ठीक आहे. माझ्यासारखी तिला थोडीच धांवपळ करावी लागते आहे ? नाहीं म्हणायला कधींमधीं रविवारची मुंबईंत भटकायला निघाली म्हणजे बसते ट्रॅम्वेंत किंवा बशींत. पण त्याही वेळेला माझ्या रूपानें हमाल बरोबर असल्यानें तिची कोणत्याही प्रकारें गैरसोय होण्याचें कारण नसतें. ट्रॅममध्यें पुरुष गर्दी करून उभे असले तरी बायकांचें बाक बहुधा रिकामें असल्यानें ती व भोदू पुरुषांच्या 'गार्ड ऑफ ऑनर'मधून थाटानें एक एक पाऊल

टाकीत त्या बाकावर जाऊन बसतात. बसण्यापूर्वी छोटूला माझ्या कडेवर व पिशवी माझ्या हातांत देण्यास कुटुंब व गोदी अनुक्रमें विसरत नाहींत. गुंडू त्यांचें अनुकरण करीत त्यांच्या बाकावर बसायला गेला कीं गोदू त्याला चापट मारून वरील पाटीकडे बोट दाखवते व म्हणते, "स्त्रिया व मुलें यांच्यासाठीं—"

गुंडू– मग मी मुलगाच आहें, नाहीं का ग आई ?

गोदू– आई, हा मागच्या वाढदिवसालाच नाहीं का ग म्हणाला, कीं मी आतां पुरुष झालों म्हणून ?

माझ्या बाबतींत वादाचा मुद्दा नसल्यानें मी अर्थात् उभाच राहतों.

उभें राहावें लागणें ही कांहीं ट्रॅमप्रवासांतली एकच गैरसोय नाहीं. ट्रॅमड्रायव्हर कधीं पुरुषांसाठीं गाडीचा खोळंबा करीत नसल्यानें पुष्कळदां चढतां चढतां तोंडघशीं पडावें लागतें. तिकिटें फार पातळ व चिटोऱ्यासारखीं असल्यानें तीं कधीं कधीं वाऱ्यासारखीं उडून जातात. बरें, अट्टल ट्रॅमप्रवाशाप्रमाणें त्यांची सुरळी करून अंगठींत घालावी किंवा रिस्टवॉचांत बसवून ठेवावी म्हणावें, तर निदान माझ्याजवळ तरी या दोहोंपैकीं एकही अलंकार नाहीं. सौभाग्यवतीला ही अडचण सांगितल्यावर तिच्या सुपीक डोक्यांत कांहीं तरी विचार येऊन ती आपल्या पायांतल्या मासोळीकडे बघते व मी घाबराघुबरा होऊन "ती बघ राणीची बाग"— —किंवा "तो बघ धोबीतलाव" असें म्हणून तिचें लक्ष खिडकीबाहेर खेंचतों. शिवाय तिकिटाची सुरळी केल्यानें ती कानात घालण्याचा मोह आवरत नाहीं, व मग इन्स्पेक्टर आल्यावर त्याला तिकीट दाखविण्याची लाज वाटते. बाकी, असलें तिकीट उलगडून तपासण्याइतकें साहस न झाल्यानें इन्स्पेक्टरनें

तशीच सुरळी परत दिल्याचींही उदाहरणें आहेत.

एकदां असाच तिकीट-इन्स्पेक्टर तपासणीसाठीं आला असतां मीं गुंडूकडे बोट दाखविलें. यामुळें गुंडयाच्या अंगावर अर्थात् प्रथम मूठभर मांस आलें. पण तो गांगरून म्हणाला, "बाबा, मीं तर छोटूच्या हातांत दिलीं होतीं तिकिटं."

छोटूनें वळलेली मूठ गुंडूला दाखवून याचा सरोष इनकार केला. गोदूनें खुलासा केला, कीं त्यानें तिकिटें गिळून टाकलीं; व गुंडूनें उपाय सुचविला, कीं त्याला एरंडेल द्यावें. इतक्यांत 'तिकीट प्लीज' ही गर्जना पुन्हा एकवार झाली, व मीं नवीं तिकिटें घेतलीं. त्यावेळीं माझें डोकें भडकून गेलें होतें कीं छोटूला एरंडेल देण्याऐवजीं खिशां-तली ॲस्पिरीनची गोळी मला तोंडांत टाकावी लागली.

पूर्वी वांद्रयाला आमच्या शेजारीं राहणाऱ्या एका नटव्या किरि-स्तांव मुलीला मात्र ट्रॅमच्या तिकिटानें ताळ्यावर आणलें होतें. तिला म्हणे रोज नव्या नव्या तरुणांची ओळख करून त्यांच्याबरोबर भटकण्याचें वेड होतें. वाङ्निश्चय झाल्यावरही हा नाद चालू राहिला असता; पण सुदैवानें ट्रॅमच्या तिकिटाची सुरळी अंगठींत घालण्याची तिलाही संवय लागली व त्यामुळें वाग्दत्त मुद्रिकेकडे वारंवार लक्ष वेधल्यानें तिला आपल्यावरील जबाबदारीची जाणीव झाली.

रेल्वेचीं तिकिटें निदान जाड असल्यानें छोटू-प्रूफ तरी असतात. पण याही बाबतींत तिकिटांचा धुव्वा उडाल्याचे दाखले माझ्या आयुष्यांत आहेत, आणि याचें कारण अर्थात् गोदूगुंडू यांचा तीन पत्त्यांचा अभिनव डाव !

शिवाय लोकल गाड्यांतून रोज जायचें नी रोज तींच तोंडें व तींच

स्टेशनें पाहायचीं म्हणजे आटा होतो हो जिवाचा! आणखी रेल्वे-प्रवासांत पासाची भानगड असते ना एक मागें? मी तर महिन्यांतून दहा वेळां पास हटकून विसरतों अन् मग केवढीही वीरश्री आणून छातीवर हात ठेवून बेदरकारपणें पास म्हणून ओरडलों तरी तिकीट-कलेक्टर मला अलग बाजूला निवडल्याशिवाय राहत नाहीं. एकदां तर मीं असें ठरवून टाकलें होतें, कीं पासाला एक रेशमी दोरा लावावा अन् त्याचें दुसरें टोक कोटाला कायमचें शिवून टाकावें. पण यावर कोपरकरांनीं मला चक्क असें सांगितलें कीं, "असं कांहीं करूं नका. कारण तुम्ही हें विसरतां, कीं कोट धोब्याकडे द्यायचा असतो. दुसरं असं विसरतां कीं तुम्ही आम्ही विसराळू आहोंत. मी एकदां असंच केलं होतं अन् धोब्याकडून कोट आल्यावर उरलेले चार दिवस तरी वापरायला मिळेल या आशेनें मी आंत राहिलेला पास शोधूं लागलों तेव्हां चघळून टाकलेल्या उसाच्या चोथ्यासारखी एक लहानशी गुठळी सांपडली. चौकशीअंतीं मला असंही समजलं, कीं पुरेपूर पंधरा दिवस आमचा धोबी महालक्ष्मीच्या भट्टीवर कपडे धुवायला नेत होता तें माझ्या पासावर !"

कांहीं लोक मात्र तिकीट-कलेक्टरच्या हातांवर तुरी देण्यांत महा-वस्ताद असतात. माधवरावांबरोबर त्यांचा ठाण्याचा एक मित्र बोरी-बंदरला आला. तिकीट काढलें नव्हतेंच. माधवराव गांगरून गेले होते. दुसऱ्या दिवशीं दुपारीं त्यांना एक जरा नाजूक 'अपॉइंटमेंट' असल्यानें त्या दिवशीं कोर्टाचें समन्सबिमन्स आल्यास त्यांना नको होतें. पण बोरीबंदरला उतरल्याबरोबर त्यांच्या मित्रानें त्यांची समजूत घालून त्यांच्या हातांतली पाईप व छानदार छडी आपल्या हातांत घेतली.




क्षणाचाही विलंब न करतां मित्रानें पाईप झटकली व 'सॉरी' म्हटलें.

माधवराव बुचकळ्यांत पडून पास दाखवून बाहेर पडले. मित्रानें उजव्या हातानें छडी हालवीत डाव्या हातानें सहज पाईप काढून बिनदिक्कत 'पास' म्हटलें. पण कलेक्टरनें हट्टाला पेटून "प्लीज शो युवर पास" असा आग्रह केला. क्षणाचाही विलंब न करतां मित्रानें पाईप झटकली व 'सॉरी' म्हटलें. बिचारा तिकीट कलेक्टर नाका-तोंडांत गेलेली राख बाहेर काढतो आहे तों माधवरावांजवळ पोंच-लेला मित्र त्यांचा पास विद्युद्वेगानें आपल्या हातांत घेऊन तिकीट-कलेक्टरला दाखवून पुन्हां "ऑफुली सॉरी !" करूं लागला. माधव-रावांच्या प्रश्नाला त्यानें उत्तर दिलें, "छडी एवढ्याचसाठीं घेतली होती कीं दुसरा कलेक्टर गडबड करूं लागला तर छडीच्या आंकडीनें त्याचा पाय ओढायचा व सॉरी म्हणायचें — पण अर्थात् (पिवळ्या पगडीकडे पहात) दॅट वॉज रिस्की !"

हे लोक रेल्वेइतकेच ट्रॅमच्या प्रवासांतही बेदरकार असतात. शक्यतों गर्दी असलेल्या ट्रॅममध्यें कंडक्टर 'जागा नाहीं' म्हणत असतां तसेच घुसतील. व पायरीवर उभे राहून दोन 'थोप्यां' (stop) चा प्रवास करतील. पुन्हा मागच्या ट्रॅम्वेंत गर्दी पाहून एकदोन थोपे प्रवास. नंतर तिसरींत चढतील. हिच्यांत चुकून गर्दी नसली तर वेडपटासारखें कंडक्टरला विचारतील, "काळबादेवी ?". त्यानें 'नहीं गिरगांव' असें उत्तर दिलें कीं एक जंगी शिवी हांसडून पुढच्या थोप्याला खालीं उतरतील. पोषाख चांगला चापचोपीचा व थाटाचा असेल तर यांच्या अंगठींत जुन्यापुराण्या तिकिटाची सुरळी ठरलेलीच; व दुमजली ट्रॅम पाहून यांनीं आंत पाऊल ठेवलेंच. नंतर लगबग जिना चढून वर जातील व थोडयाच वेळानें विचार बदलल्यासारखें दाखवून

खालीं उतरतील व खालच्या मजल्यावर खिडकीजवळ बसतील. कंडक्टरनें तिकीट विचारल्यास त्याच्याकडे दुर्लक्ष करून 'उपर लिया' असें सिनेमाच्या पाट्या वाचीत उत्तर देतील. 'शेठ' लोकांच्या पोषाखाकडे व अंगठींतील तिकिटाकडे पाहून कंडक्टर अधिक चौकशी करीत नाहीं. त्यांतून त्यानें केलीच तर हे लोक अंगठींतून तिकीट निघतच नाहीं असा बहाणा करतील व शेवटीं खूप जोर केल्यावर तिकीट बाहेर निघेल पण तें अशा झटक्यासरशीं कीं क्षणार्धांत खिडकीबाहेर त्याची वाऱ्यावर वरात! मग अर्थात् "बडी आफत हुई!" करीत एक आणा देऊन दुसरें तिकीट घ्यावें लागतें पण बेअब्रू टळते. कांहीं लोक मात्र धांवपळ करून ट्रॅमखालीं उतरून त्या उडणाऱ्या तिकिटामागें धांवण्याइतके निगरगट्ट असतात. तिकीट अर्थात् त्यांच्या मुठींत सांपडणें कठीण असतें. पण त्यामुळें त्यांची झांकली मूठ सव्वा लाखाची राहून गाडींतल्या उतारूंत हंशा पिकवल्याचें त्यांना श्रेय मिळतें.

आमचे भिकूभटजी प्रथमच जेव्हां मुंबईस आले तेव्हां त्यांना ट्रॅमची बरोबर कल्पना नव्हती. वाडीबंदरहून दादरकडे जातांना एक बरीशी ट्रॅम पाहून ते आंत चढले. दुसरें कोणीच चढेना हें पाहून त्यांना जरा नवल वाटलें व ट्रॅमला आंत बसण्यासाठीं खुर्च्या नाहींत, इतकेंच काय पण आंत शिरायलाही दार नाहीं हें पाहून अधिकच नवल वाटलें. मग ते बाहेरच्या जागेंतच उभे राहून "The Electricity", "Electricity is best" वगैरे पाट्या वाचूं लागले. त्यांचा हा अवतार व हातांतलें बोचकें पलीकडून जाणाऱ्या ट्रॅमच्या ड्रायव्हरनें पाहून त्या ड्रायव्हरच्या एकंदर प्रकार लक्षांत आला व या ड्रायव्हरनें लगेच खालीं

उतरून भटजींचा कान धरून त्यांना ही कंपनीची दुरुस्त-कामाची गाडी आहे असें सुनावलें.

भटजींचे धाकटे बंधु दामूभटजी यांनीं तर एकदां कमालच केली. ते पहिल्यांदा 'दादा'बरोबर मुंबईंत आले तेव्हां त्यांना माहीत होतें कीं, मुंबईंत 'बस' नांवाचें नवीन वाहन निघालें असून त्याला छान-दार पॉलीश व कांचेच्या खिडक्या असतात, पण भाडें जास्त असतें; तेव्हां 'दादा' कांहीं आपल्याला त्यांतून नेणार नाहींत हें ते जाणून होते. पहिल्याच दिवशीं दुपारचे चहाचा कप मारून भटजी बाहेर पडले व बशीची वाट पाहूं लागले. टिळक पुलाजवळ लवकरच त्यांना हवी होती तशा प्रकारची मोटार गाडी मिळाली. गाडीला चारी बाजूंनीं कांचा होत्या; व तिच्यापुढें लांब झगे घातलेले चार पांच लोक कांहीं तरी पुटपुटत चालले होते. ड्रायव्हरला सांगून यांना दूर घालवून देऊं असें मनाशीं ठरवून दामूभटजींनीं झपाट्यानें जाऊन कांचेचें दार उघडलें. आंत पाय ठेवल्याबरोबर ते म्हणाले, "अरे वा ! दुसरं कोणीच नाहीं इथं ! मग झोपायाला काय हरकत आहे ?"

पण भटजींना क्षणभरसुद्धां झोपायला मिळालें नाहीं. ते अंमळ खालीं पडतात तोंच "ही इज् मॅड ! – मॅड ! –", "पकडो उसकू !" "—हैसा कुठूनसा आंत शिरलॉव ? " इत्यादि आवाज त्यांना ऐकूं आले. भटजी पुन्हा उठले व मागून येणारी सूटबूटवाल्या बोडक्या किरिस्तावांची ती धांदल पाहून चकित झाले. ते कोंपऱ्यांत अंग चोरून बसले व भीत भीत बोलले, "या कीं ! तुम्हांला जागा आहे आंत." पण त्या लोकांनीं त्यांच्या आमंत्रणाचा स्वीकार

करण्याऐवजीं पोलिसांनींच पुढें येऊन दंडुक्यानें भटजींचें स्वागत केलें. नंतर दंडाची रक्कम भरल्यावर भिकूभटजी डोळ्यांत पाणी आणून म्हणाले, "इतके रुपये फुकट पाण्यांत गेले. त्यापेक्षां मला बोलतास तर अफगाण चर्चपर्यंत तुला तीनदां कीं रे बसमधून फिरवून आणला असता!"

टिळक पुलावरचें तें दृश्य पाहून त्याचा अर्थ मात्र निरनिराळ्या लोकांनीं निरनिराळा केला. एक गृहस्थ शिष्टपणानें सांगूं लागले, "चोर आहे, दुसरं काय? प्रेताचं ताळू चाटणारे लोक आहेतच कीं जगांत!"

तर दुसऱ्या एकानें घरीं येऊन बातमी दिली : "मर्तिक उठून बसलं."

———

## (६) उत्सव—जत्रा—उरूस

चांगली एकाला एक लागून सुट्टी आली होती परवां, तेव्हां म्हटलें मंडळींना घेऊन पुण्याला सोन्याबापूंकडे चक्कर टाकून येईन. पण सुट्टी कसली आहे तें ध्यानांत घेतलें नी तडाफडकी बेत बदलला. चालत्या ट्राममध्यें चढणें अन् गणपतीच्या दिवसांत बाहेरून पुण्याला जाणें एकप्रकारें सारखेंच म्हटलें पाहिजे. ज्याला सराव आहे त्याला मजा वाटेल; इतरांचें डोकेंच फुटायचें— किंवा पिकायचें!

आणि दुसरें असें कीं, मुंबईत काय ही 'मजा' थोडी आहे? श्रावण महिन्यांत सुट्ट्या खूप म्हणून एरवीं वैतागलेला मुंबईकर जरा बिचारा खुषींत असतो, तोंच महिन्याचा शेवट येऊन आगामी गणेशोत्सवाचे ढग जमूं लागतात. स्पष्टच सांगायचें तर या चळवळ्या लोकांच्या बोडक्यावर वर्गणीचा पाऊस पाडण्याची ती सूचना असते. मला संताप येतो तो पैसे देण्याचा! एरवीं तुमची ती हुल्लड, ते मेळे, तीं गाणीं नी ते संवाद ऐकून घेईन मी. पण निढळाच्या घामानें मिळवलेल्या दिडक्या कां म्हणून ओतायच्या तुमच्यापुढें? बरें, हे फंडगुंड येतात ते तरी सिधेपणानें?—छट्, मुळींच नाहीं! छक्केपंजे त्यांच्या पांचवीलाच पुजलेले. येतील, जोडे बाहेर काढतील, कोपरापासून हात जोडतील, तब्येत कशी आहे म्हणून विचारतील "चहाबिहा ठेवूं नका बुवा" म्हणून सांगतील, छोट्याचा गालगुच्चा घेतील, 'काय रे गुंड्या, तुला काय आवडतें?' म्हणून विचारतील—

नुसतेंच ! देणार नाहींत पेपरमिठाची गोळी सुद्धां !—— नी चोपडी उघडून पावती फाडतील. आंकडा बहुतकरून टाकलेलाच असतो. आपण फक्त चश्मा लावून तो कितीचा आहे हें बघायचें नी त्या मानानें पिशवी खुली करायची.

शिवाय येतात ते एकास एक आधार अशा जोडीजोडीनें. आणि अशा जोड्या दहा पांच तरी फिरकत असतीलच. सगळेजण अर्थात् वाडीचे गेल्या तीस वर्षांपासूनचे आधारस्तंभ असतात—— एका मिसूड न फुटलेल्या गुंडानेंही हीच ग्वाही दिली. गेल्या सोमवारीं मेंढ्यासारखें तोंड असलेला एकजण आला, नी हें: हें: हें: करीत "वहिनी कशा आहेत ?" म्हणून चौकशी केलीन्. मीं उलट प्रश्न केला, "काळ्या का गोऱ्या विचारतांहा ना ?" अन् चक्क त्याच्या तोंडावर म्हटलें, "वाट चुकलां असाल आपण." पुढें मनांत असेंही बोलून गेलों कीं, स्टेशनजवळच्या कत्तलखान्यांत आपण जायला पाहिजे होतें, म्हणजे आपली चांगली वाट लागली असती. पण गृहस्थ खमंग इतका, कीं खांद्यावर हात ठेवून म्हणतो, "वा राव ! ओळख विसरलांत वाटतं ? —बरं, जाऊं द्या. गोदीचा दांत पडला होता तो कसा काय आहे ?" मी संतापून त्याची बत्तिशी रंगवणार होतों; पण नुसतेंच दांतओठ चावून उत्तरलों, "माहीत नाहीं. छपरावर टाकला होता. पहायचा असल्यास शिडी लावून देतों." शेवटीं अर्थात् त्याचा खरा उद्देश बाहेर पडला; अन् वर्गणीचा रुपाया खिशांत टाकल्यावर "भारी बुवा थट्टेखोर तुम्ही" असें म्हणून दांत दाखवीतच तो निघून गेला.

गणेशोत्सवांत आमच्या गुंडयाची धांदल विचारूं नका. पांच

वर्षांचें पोर, पण चळवळीचा श्रीगणेशा आतांपासून सुरू झालेला. यंदा बापड्याला कुठल्याशा मेळ्यांत गालबोट म्हणून घेतलें होतें. पण त्यासाठीं बिचाऱ्यानें मेहनतही खूप केलीन्. मुद्दाम गाणें शिकला. "माझा गुणाचा तो" म्हणून सौभाग्यवतीनें रास्त कौतुक केलें व मलाही पोराचा अभिमान वाटला. पण वास्तविक गुलाम गाण्यासाठीं मेळ्यांत शिरला नव्हताच मुळीं. कारण पांच मुलांत गुंड्या असला कीं, चार मुलें गायचीं अन् हा नुसताच तोंड उघडून मिटायचा. एकापरी चांगलेंच होतें. कारण पोरगा खरोखरीच गायला लागला असता तर झोंपलेले श्रोतेही उठून घराकडे गेले असते अन् बिचाऱ्या विघ्नहर्त्याचे प्रचंड कान किटून त्याची अपकीर्ति झाली असती.—तर सांगायचें काय, कीं दुसऱ्या का तिसऱ्या दिवशीं गुंड्याच्या खोलींत खिरापतीची रास अन् बताशांची चळत पाहिली नी गुंड्याचें खरें बिंग समजून आलें.

सौभाग्यवतीलाही गणेशोत्सव मनापासून आवडतो. कारण नवीं लुगडीं नेसून मिरवायला मिळतें; किंवा मिरवायला लुगडीं हवींत म्हणून नवीं घ्यायला मिळतात. शिवाय गणेशोत्सव हा 'मेन्ली' पुरुषांचा! मरमर मरायचें त्यांनींच, मंडप उभारायचे त्यांनींच, आरत्या करायच्या त्यांनींच—त्यासाठीं कित्येकदां हरवलेली टोपी उचलून डोक्यावर ठेवायची त्यांनींच—अन् बायकांनीं मात्र नुसते संवाद ऐकायला म्हणून यायचें, नी वर आपलाच संवाद सुरू करायचा. स्त्रीदाक्षिण्यामुळें त्या बोलत असल्या तरी त्यांना बोलतां येत नाहीं.

म्हणजे कार्यक्रमांत ऐकण्यासारखें कांहीं असतें असें नाहीं म्हणत मी. उलट शक्य तितक्या लवकर तिथून पळ काढलेला बरा असतो;

आणि तेवढयासाठीं व्यासपीठाजवळ बैठक न मारतां मागें मागें उभें राहिलेलें बरें असतें. अलीकडे उत्सवालाच मी विटलों आहें म्हणून; नाहीं तर मागें मी असेंच करायचा. मुंबईला जाऊन वेलणकराकडे भरपूर जेवण खायचें अन् मग 'एक–दोन' करीत गिरगांव काळबा-देवीचे सगळे मुक्काम घेत शेवटीं भांगवाडीचा गणपति गांठायचा. दुसऱ्या दिवशीं पुन्हा "वेलणकर" चापून बनामा लेन, दोन देवळें करीत उलटा हात मारायचा. असें केलें म्हणून तर डोकें फिरलें नाहीं व डोक्याचा केसन् केस काळा राहिला.

कारण एकंदर सतावून सोडण्यासारखाच कार्यक्रम असतो. काय ते मेळे नी काय त्या पद्यावल्या ! काय ते स्वयंसेवक नी काय त्या ग्यासच्या बत्त्या ! त्यांतून डोळ्यांवर झांपड आलेल्या त्या परकऱ्या पोरी जेव्हां 'स्वागत हेंऽ अपणां—' किंवा 'नमुं शारदा—' म्हणून किंचाळूं लागतात किंवा मेंदूवर बुरशी आलेले वक्ते कपाळावर आरशी चढवून 'आमची सनातन संस्कृति व —' म्हणून उपदेशाचे डोस पाजूं लागतात तेव्हां सुरवातीलाच तिथून सूंबाल्या केलेला बरा वाटतो. खरें सांगायचें तर मला आपल्या त्या नकला नी ते पोवाडे आवडतात. पण असले कार्यक्रम ऐकण्याचें तरी नशिबांत लागतें. माझें काय व्हायचें, नाक्यानाक्याचे गणपति घेत अमुक ठिकाणीं पोवाडा आहे असें ऐकल्यावर मी तिकडे कूच करीं...तों तेवढयांत त्या ठिकाणीं इतकी गर्दी जमलेली असायची कीं, 'सिंहीण निजे घायाळ—' ही वीरश्रीयुक्त ओळ कानांवर पडून माझ्या अंगावर रोमाञ्च उभे राहताहेत तों लगोलग माझ्या घायाळ शरिरावर आड-दांड श्रोत्यांची तल्लीन फौज उभी राहायची. कांदेवाडींत श्री. दोड-

क्यांच्या नकला होणार हें ऐकून मी एकदां तातडीनें तिकडे गेलों; तरीसुद्धां उशीर झाल्याची धाकधूक वाटत होती. पण सुदैवानें कांदेवाडींत पोंचलों तेव्हां कार्यक्रम चालूच होता. श्रोतृवर्गही विरळ पाहून समाधान मानीत पुढल्या रांगेंत जाऊन बसलों व समोरची उपरणेवाली व्यक्ति पाहिली नी तिच्या गर्जना ऐकल्या तेव्हां ताडलें कीं ही दिसते आहे 'बिनदिक्कत' पत्राच्या संपादकाची नक्कल. एकंदर नूर पाहून खूप झालों व मान डोलवूं लागलो तो कुठूनसा एक कुजका बटाटा माझ्या टाळूवर येऊन आपटला. तो बहुतकरून व्यासपीठासाठीं योजलेला असावा. डोळे उघडून व डोक्यावरून हात फिरवीत संतापानें शेजाऱ्याला म्हटलें, "काय लोक तरी असतात हो? इतकी हुबेहूब नक्कल चालली आहे तरी त्यांत व्यत्यय!"

शेजाऱ्यानें गंभीरपणें उत्तर दिलें, "नकला संपल्या; हें व्याख्यान आहे." मीं भिऊन म्हटलें, "कुणाचें?" तो म्हणाला, "बिनदिक्कत पत्राचे सुप्रसिद्ध संपादक श्रीयुत—" पण मी पुरतें ऐकण्यास थांबलोंच नाहीं. तिथून घाम पुशीत "यः पलायते" केलें व जवळच्या तांबे आरोग्यभुवनांत शिरून "गरम गरम आण" म्हणून फर्मावलें. "काय?" अशी पृच्छा होतांच ओरडलों, "काय वाटेल तें आणरे— पण आण! —झुणकाभाकर सुद्धां चालेल!"

माणूस जात्या उत्सवप्रिय असतांना मी असा विटलेला कसा अशी शंका कांहीं वाचक काढतील. अन् आमचा रंगराव तर यामुळें उलटा सिद्धान्त काढून हा माणूसच नाहीं असेंही बडबडायला लागतो. वास्तविक माझी हरक़त उत्सवाला नसून कार्यक्रमाला आहे. मात्र साहित्यिक लोकांचे उत्सव पूर्णपणें बाद (taboo) समजावेत.

पुण्यतिथीला हजर राहण्यास माझी हरकत नसते. फक्त तिथें जातांना कुणाची पुण्यतिथि आहे तें 'नवा काळां'त पाहून जावें लागतें. कारण पुष्कळदां असें होतें कीं अशा वेळीं भावनेच्या भरांत 'शिवाजी', 'तुकाराम महाराज', 'अहिल्याबाई' इत्यादि सर्वच नांवें येऊन जातात नी ऐकणाराला भ्रमिष्टासारखें होऊन हें श्राद्ध मूळ आहे कुणाचें नी आपण विकतचें घेतलें कुठून, असें होतें.

मला आवडणारे खरे उत्सव म्हणजे जत्रा नी उरूस होत. सौभाग्यवतीलाच विचारा, आम्हीं महालक्ष्मीची जत्रा एकदांतरी चुकवली आहे का तें! यंदा कदाचित् छोटूचा अवतार झालेला असल्यानें नाहीं जमायचें. पण गोदू गुंडू थोडींच गेल्याशिवाय राहाणार आहेत! महालक्ष्मीला जायचें म्हणजे समारंभच असतो तो! या शुभप्रसंगीं बाईसाहेबांनीं लुगड्यांखणांचें कपाट अन् आम्हीं खास कपाटाचे खण एकदमच उघडायचे असतात. वांधा येतो तो इथेंच. गृहलक्ष्मीच्या स्थलान्तरावांचून महालक्ष्मी प्रसन्न करतां येती तर आणखी काय हो पाहिजे होतें? पण तें कुठलें व्हायला? सहकुटुंब सहपरिवार आमची फलटण महालक्ष्मीला गेलीच पाहिजे नी तीं खेळणीं नी त्या मिठाया घरीं येऊन पडल्याच पाहिजेत. माझी भोळी आशा इतकीच आहे कीं, पुढेंमागें या खर्चांत भर म्हणून 'जत्रेंत गहाळ' झालेल्या गोदी अगर गुंड्याच्या शोधार्थ जाडें बक्षिस लावण्याचा प्रसंग माझ्यावर येऊं नये! कारण, वांद्र्याची मठमाहुली जवळ असल्यानें तिथल्या जत्रेंत संध्याकाळीं रोज फेरफटका करायचा व कित्येकदां 'उणें–गुंडू' परत यायचें असा आमचा नित्यक्रम आहे. मला 'नवरात्र संपलें व दसरा उजाडला' म्हणजे कधींकधीं

मुक्ततेचा श्वास सोडावासा वाटतो तो या एकाच अडचणीमुळें.

तसें म्हणाल तर जत्रेंत हिंडतांना मी भारी उल्हासांत असतों. 'तुला काय पाहिजे ?— बोल, निवड यांतून लवकर' वगैरे आश्वासनें सुनावण्यांतही एक प्रकारचा मोठेपणा असतो. आमच्या गोदीची निवड कधींच झट्दिशीं व्हायची नाहीं. एकदां म्हणेल मला तें विमान द्या, मग म्हणेल छट्! ती जपानी बाहुलीच बरी. यामुळें धक्केबुक्के खात सबंध जत्रा फिरून पुन्हा पहिल्या जागीं केवळ गोदीसाठीं यावें लागतें. जत्रेंत "भूलभुलैय्या" म्हणून एक करमणुकीचा प्रकार असतो; पण पैसे देऊन वाट चुकण्यापेक्षां अशा रीतीनें गर्दींत शिरून परागंदा होणें यांत खरा Thrill नाहीं का? काटकसरी गुंड्याला ही कल्पना बरेच दिवसांपासून सुचलेली आहे व तो ती अंमलांतही आणतो. त्यामुळें त्याच्या पाठीं मी व माझ्या पाठीं शोधार्थ क्रमाक्रमानें इतर मंडळी असा एक कौटुंबिक भूलभुलैय्याच तयार होतो.

'काय घ्यायचं ?' म्हणून विचारलें कीं गोदूप्रमाणें घुटमळत न बसतां गुंडू ताड्दिशीं कुठेंतरी बोट दाखवतो, मात्र त्याची निवड झटपट असली तरी पुष्कळदां सामान्य दृष्टीला पटण्यासारखी नसते. एकदां 'तुला खायला काय पाहिजे ?' म्हणून विचारले असतां गुंडूनें सळईत घालून शेगडीवर "भजीं" भाजीत बसलेल्या एका दाढीवाल्याकडे आ वासून पाहिलें होतें; अन् खेळणें म्हणून एक विचित्र माकड खरीदून माझ्या खिशांत टाकलें होतें. मला काय माहीत, त्यानें माकडाला किल्ली दिली होती म्हणून ?—अन् परत जातांना माझ्या पोटाला बसणारे चिमटे भुकेचे किंवा ढेकणांचे नसून त्या

माकडाच्या ऑँव ऑँव करणाऱ्या दांतांचे होते म्हणून ?

जत्रेंतून हिंडतांना मी गुंडयावर सक्त नजर ठेवतों तो त्याच्या या व्रात्यपणामुळेंच. तरी एकदां आमची नजर चुकवून तो एका बंगाली जादूगाराचे खेळ पाहण्यास उभा राहिला. गोदीनें ही गोष्ट आपल्या आईच्या लक्षांत आणली. लगेच आम्ही माघारीं फिरून त्या जादूगाराच्या अड्डयाकडे गेलों. जादूगारानें आपल्या पुढ्यांत ठेवलेल्या भेसूर कवटीकडे गुंडू कौतुकानें पहात होता. तेवढयांत एका रिकाम्या पेटाऱ्यावर छडी आपटून जादूगारानें आव्हान दिलें, "बोलो कोई लडका है इसमें बैठनेवाला ?" मी भयशंकित होऊन गुंडयाला मागें ओढणार तोंच त्यानें शूरपणानें स्वत:ची रिक्रूटभरती केली. जादूगारानें त्याची पाठ थोपटतांच माझ्या अंगावर मूठभर मांस आल्याशिवाय राहिलें नाहीं. सौभाग्यवतीला मात्र दे माय धरणी ठाय झालें. गुंडू आतां जाणार तेव्हां एकटयापुरतेंच चॉकलेट घ्या असें गोदीनें मला सुचविलें. गुंडू पेटाऱ्यांत उतरला, झांकण लागलें, पिशाच्चांना आमंत्रण पोंचलें, थोडया वेळानें पुन्हा झांकण उघडलें व हजारों डोळे पेटाऱ्याकडे आतुरतेनें लागले. जादूगारानें आंत काठी खुपसून गुंडूचें हाडुकसुद्धां उरलें नसल्याचें सिद्ध केलें व सौभाग्यवती किंचाळी फोडून माझ्या खांद्यावर पडली. मी घाबराघुबरा झालों. जादूगारानें टोपी फिरवून पैशाची मागणी केली. सौभाग्यवतीनें मोहनमाळ काढून रडत म्हटलें, "बाबा रे, वाटेल तें घे पण माझा गुंडूराजा मला परत दे." मीं तिला आवरलें व जादूगाराला पोलिसाच्या ताब्यांत देण्याची दहशत घातली. त्यानें हंसून माझ्याकडून रुपया घेतला व पेटाऱ्यावर पुन्हा मंतर टाकला. झाकण उघडलें. तों फक्त एक कोंबडीचें

अंडें निघालें. जादू फसली हें पाहून त्यानें बावरल्यासारखें दाखवलें. सौभाग्यवतीनें हंबरडा फोडला. मी जादूगाराचा कान धरून त्याला पोलिसठाण्यावर नेणार तों जादूगारानें अंडें आपटून फोडलें व माझाच कोट कोणीतरी धरलेला पाहून मागें वळतों तो गुंडू 'कशी केली !' अशा अर्थी डोळे मिचकावीत उभा होता !

उरसाबिरसांत हिंडतांना मला लहानपणचे दिवस आठवतात. मी अगदीं पोरच बनतों म्हणा ना ! आमच्या बाळपणीं पोरांना खर्चाला फार पैसे मिळतच नसत. दोन देवळाच्या जत्रेंत दिडकीचें पिटपिटें घेऊन दिलें कीं आम्ही खूष असूं. आतां दिवस बदलले आहेत. त्या कळीच्या मोटारी काय, तें कॅरम काय, ते बाजे काय नी तीं बॅटबॉल काय ! पण पोरांसाठीं या जिनसा घेऊन द्यायला, इतकेंच काय पण त्यांच्याबरोबर पाळण्यांत बसायलाही माझी तयारी असते. सौभाग्यवतीला हें आवडत नाहीं व 'अगदींच पोरागत करायचं !' म्हणून ती बाजूला उभी राहते. जिच्या हातीं पाळण्याची दोरी तिनेंच असा असहकार केल्यावर बिचाऱ्या पुरुषांनीं काय करावें ? कुठल्याशा जत्रेंत अशीच एकदां गम्मतचक्रा (Merry-Go-Round) वर बसण्याची हुक्की आली. गोदी गुंड्यांनीं तर लगेच टाळ्या पिटून घोड्यांवर बैठक मारली सुद्धां. मीं तिलाही खूप आग्रह केला. पोरकटपणाचा न्यूनगंड दूर करण्यासाठीं तिला "जग हें नाहीं तरी एक गंमतचक्र आहे व त्यांत आपण गरगर फिरायचं असतं. म्हटलंच आहे—चक्रनेमि-क्रमेण—" वगैरे तत्त्वज्ञान सांगितलें. पण तिनें साफ बजावलें 'मी येणार नाहीं; माझं डोकं फिरेल.' शेवटीं मला स्वार्थत्याग करण्याची

इच्छा नसल्यानें मीं तिला महिलांच्या एका चिमुकल्या सभेंत बसविलें नी स्वत: गंमतचक्रांतल्या उरलेल्या घोड्यावर टांग मारली.



**आणि दहा मिनिटें गोल गोल फेऱ्या मारून जेव्हां खालीं उतरलों तेव्हां तिला भेटण्यासाठीं म्हणून तिघांनीं तीन दिशा धरल्या.**

आणि दहा मिनिटें गोल गोल फेऱ्या मारून जेव्हां खालीं उतरलों तेव्हां तिला भेटण्यासाठीं म्हणून तिघांनीं तीन दिशा धरल्या, कारण माथीं गरगरां फिरत असून 'कुत आयात:' असें झालें होतें. समाधान एवढेंच होतें कीं पृथ्वी गोल असल्यानें 'रौंड' मारतांना कुठें तरी गांठ पडेल. पण मला राहून राहून टोंचल्यासारखें वाटत होतें कीं, आतां राणीसाहेब काय म्हणतील ? बेपत्ता झालेलीं गोदी-गुंडू व माझें भिरभिरणारें मस्तक इत्यादि गोष्टींचा परिणाम

होऊन तिचें तर मस्तक भडकणार नाहीं ? 'तरी मी सांगत होत्यें—' वगैरे ठशाचें व्याख्यान तर ऐकावें लागणार नाहीं ?

पण 'महिला-मंडळा'च्या तंबूपाशीं पोंचलों नी चकित झालों. कारण सौभाग्यवती माझ्यापेक्षांही भ्रमिष्ट झालेली दिसली. डाव्या हातानें तिनें डोकें दाबलेलें असून उजव्या हातानें कुणाला तरी दूर लोटल्याचा मूक अभिनय ती करीत होती. फुकटे प्रेक्षक बरेच जमले होते.

मीं घाईघाईनें जवळ जाऊन विचारलें, "असं काय करतेस ?—झालं काय तुला ?"

वेडयासारखें हंसून तिनें उत्तर दिलें, "डोकं फिरलं माझं."

"पण—–झालं काय ?"

"व्याख्यान ऐकलं— शिशुसंगोपनावर."

## (७) मुंबई दास्यवणें

वांद्याला गाडींत चढल्याबरोबर सहज खिडकींतून बाहेर पाहावें नी कत्तलखान्याची इमारत पाहून मन विषण्ण व्हावें अशी बऱ्याच हळव्या लोकांची स्थिति होत असेल. पण रोज मरे त्याला कोणं रडे ?—अन् जो रोज मरे, तो दुसऱ्यासाठीं कशास रडे ? तो कत्तलखाना नी तीं वर घोंघावणारीं गिधाडें पाहून माझ्या डोळ्यांत टिपूसत्रिपूस तर कांहीं उभें राहत नाहीं—मात्र जर ऑफिसमध्यें निघालों असेन तर पुढें होणाऱ्या 'चंपी'चें दृश्य डोळ्यांपुढें उभें राहतें; अन् परत आलेला असेन तर गिधाडें बाजूला राहून पोटांत कावळेच ओरडूं लागतात.

फक्त चार दोन प्रसंगच वर्षांतून असे येतात, कीं ज्या वेळीं गाडींतलें वातावरण भयाण वाटल्यामुळें मी आशेनें खिडकीबाहेर पहातों नी कत्तलखान्याचें मला कांहीं वाटत नाहीं. कारण माझें रक्त आधींच गोठलेलें असतें. अन् गाडींत कांहीं अजब मानवी कावळ्याचिमण्यांनीं माझें डोकें उठवून आधींच लचके तोडलेले असल्यामुळें घिरटया घालणारीं तीं गिधाडें फूलपांखरांइतकीं सुंदर वाटतात. कत्तलखाना तर कमळांनीं भरलेलें तळें वाटतें हें सांगायला नकोच.

कारण या वेळीं माझी अवस्था बळी द्यायला नेत असलेल्या अजापुत्रागत असते. भोवतीं जमलेले तमाम पुजारी नी उपासक कोंकराकडे ज्या पवित्र भावनेनें अन् आत्यंतिक पूज्यबुद्धीनें

पहातात— अगदीं थेट त्याच दृष्टीनें गाडींतला माझा गोतावळा माझ्याकडे बघत असतो. बिचाऱ्यांना काय कल्पना, कीं या बापड्या कोंकराला असली भक्ति नी पूजा नको असते— अन् बिचाऱ्याच्या शरिरांतला कणन् कण 'पाहि मां ! पाहि मां !' म्हणून ओरडत असतो ?

बळी देण्याच्या बोकडापुढें मरून जाण्याखेरीज दुसरा प्रश्न तरी नसतो. पण 'मुंबई दाखव' म्हणून गचांडी देऊन ज्याची वरात काढली आहे त्याचें जिवंत मरण लेखणीनें चितारण्याइतकें सरळ खास नाहीं ! जावें त्याच्या जन्मा तेव्हांच कळे.

तुम्हीच पहा— वैतागवन म्हणून सदासर्वदा ज्या शहराच्या नांवानें मी कडाकड बोटें मोडतों त्याच शहरांतून खेडवळ पाहुण्यांची फलटण घेऊन हिंडायचें नी त्याच उपरोक्त बोटांनीं 'हा पाहिलात राजाभाई टॉवर ?', 'तो पाहिलात राणीचा बाग ?' इत्यादि इत्यादि निर्देश करायचा— सोपें काम नाहीं तें. कोणत्याशा संतानें कुठेंसें म्हटलें आहे कीं, आपुलें मरण पाहिलें म्यां डोळां ! मी म्हणतों, पाहिलें असशील. अगदीं चमत्कार केलास यांत शंका नाहीं; याबद्दल तुझ्या त्या तीक्ष्ण डोळ्यांत धन्यवादपूर्वक जितकीं फुलें टाकावींत तितकीं थोडीं आहेत. पण गृहस्था, तूं आपलें मरण स्वतः पाहूनच थांबलास; दुसऱ्याला तरी दाखवलें नाहींस. 'मी कसा मरतों आहें तें बघ' असा कंठशोष तरी तूं केला नाहींस. शव-पेटिकेंत ठेवल्यानंतर अर्धवट उठून 'वा वा ! काय सुंदर पेटी आहे माझी !' अशा रस्त्यावरील लोकांजवळ तूं बढाया तरी मारल्या नाहींस ! थोडक्यात म्हणजे चव्वीस तास मुंबईचा वैताग आलेला

असूनही पाहुण्यांजवळ "वाहवा रे आमची मुंबई ! तुमच्या भगभग-पूरला आहे का असा टॉवर ?—असलें बंदर ?—असला सिनेमा ?–" वगैरे नितान्तरम्य नी सुतराम् झूट विचार तूं सुनावले नाहींस !

अहो, या सगळ्या थापा असतात. मुंबईंत आहे काय असें पाहण्यासारखें, तर त्यासाठीं आपला वामकुक्षीचा वेळ दवडून अन् वर वक्तृत्वाचे फवारे सोडीत नी चमत्कारिक हातवारे करीत गांवभर हिंडायचें तें ? अस्मानांत भिडणाऱ्या हवेल्या आहेत इथें हेंच किनई ? अस्मान काय, सगळीकडे असतें अन् गांव आहे तिथें घरही असायचेंच. मग त्या अस्मानाची नी त्या घराची मनांतल्यां मनांत गांठ पाडून द्यावी म्हणजे झालें. कल्पनेचें काम आहे तें. ज्याचा वरचा मजला अगदींच खालीं नाहीं तो मनोराज्यांत वाटेल तितके मजले उठवूं शकतो. आणि तसें करणें अधिक सोपेंही असतें; कारण बिछान्यावर पडल्या पडल्या कसलाही त्रास न पडतां या उत्तुंग इमारती निरखतां येतात. सॅण्डहर्स्ट पुलाजवळ उभें राहून हें निरीक्षण करतां येणें खात्रीनें अधिक कठीण आहे. कारण त्यामुळें बाहेरगांवच्या माणसाला 'आम्ही जातों अमुच्या गांवा' म्हणण्याची पाळी यायची.

नाहीं, म्हणजे पाहुणा आला रावळा आला, कीं त्याला अगदींच घरीं बसवून ठेवावा अशा मताचा नाहीं मी. किंवा पाव्हण्यांच्या नांवानें शिव्या मोजणाऱ्यांतही माझी गणना होत नाहीं. पण दुर्दैवानें बाहेर-गांवीं जाणाऱ्या पाव्हण्यांत नी मुंबईला येणाऱ्या नव्या पाव्हण्यांत एक जबरदस्त फरक आहे. मुंबईला येणाऱ्या नव्या पाव्हण्यांचा घसा दोन वेळचें जेऊन व तीन वेळचा चहा पिऊन गप्प बसत नाहीं. जोर

येऊन तो वखवख करूं लागतो व म्हणतो, "मला मुंबई दाखवा." अरे, 'मुंबई दाखवा' बोलायला काय जातें तुझें ? दाखवणारांचे हाल कुत्रासुद्धां पुशीत नाहीं, याचा कांहीं हिशेब ? मुलगी दाखवणें सुद्धां एक दिव्य आहे हें कबूल. पण दोहोंत फरक इतकाच कीं, सतरा ठिकाणीं मुलगी दाखवल्यावर तिच्या जंजाळांतून तरी बाप सुटतो. मुंबई दाखवून घरीं परत आल्यावर मुंबई तर जन्माची मागें लागलेली सुटायची नाहींच, उलट आपण कितपत शिल्लक राहतों याचीच वानवा असते.

तेव्हां पाव्हण्यारावळ्याला एकवार दादरपर्यंत नेऊन नंतर टाम-रेल्वींतून बालार्ड पिआरपर्यंत न्यावें; त्याला माझी विशेष हरकत नाहीं. पण तो जर रोज भुंग्यासारखा मागें लागेल अन् 'आज अमुक पहायचं' नी 'उद्यां तमुक पहायचं' असा प्रोग्रॅम आखूं म्हणेल, तर त्याला मात्र माझा सपशेल नकार असतो— अर्थात् सौभाग्यवतीनें जोंवर मोडता घातला नाहीं तोंवरचाच हा निश्चय ! तिचे पाव्हणे असले कीं, निश्चयबिश्चय बाजूला ठेवून झक मारीत मला हिंडावेंच लागतें बरोबर. गुदस्तांचीच गोष्ट घ्या. सौभाग्यवतीच्या लाडिवें गांवाहून कोंकणची बोट तेरा आबालवृद्धांचें पार्सल घेऊन भाऊच्या धक्क्याला लागली. फळांचे नमुने बघायला मी पावती उर्फ पत्र घेऊन आलोंच होतों. अन् एकंदर पार्सल पाहून भाऊराया, काय धक्का बसला आहे मला ! माझी रोजनिशी उघडलीत तर अजूनही तुम्हांला ती नोंद सांपडेल. दोन बंडी घातलेले म्हातारे, एक सोवळी बाई, दोन सवाष्णी, दोन बावळट दिसणारे तरुण व बाकीची पिल्लावळ असा एकंदर फौजेचा आंकडा होता. म्हणजे म्हातारें

होऊं नये, बंडया घालूं नयेत, सवाशीण असूं नये, सॉवळें होऊं नये किंवा पिलें असूं नयेत असें नाहीं माझें म्हणणें. निदान त्यावर मत देण्याचें हें तरी स्थळ नव्हे. ही सर्व मंडळी येऊन डाराडूर माझ्या घरीं झोंपती तर फारसा वांधा नव्हता. पण ती आली होती जाहीरपणें मुंबई बघायला. अन् एवढी फौज घेऊन व त्यांत आमची खास राखीव फलटण मिसळून मुंबईभर तिला फिरवणें नेपोलियनला तरी शक्य झालें असतें का, सांगा तुम्ही ?

बंदरावरून वांद्र्यापर्यंत थेट गाडीनें जायचें ठरवून मीं तीन टॅक्स्या तयार ठेवल्याच होत्या. सामानासकट सर्वांना आंत बसवल्यावर गाडया सुटल्या. जातां जातां वाटेंत बरीच माहिती पाहुणे-मजकुरांना सांगण्याचा मीं प्रयत्न केला. उद्देश हा कीं दाखवतां येईल तेवढी मुंबई आतांच दाखवून टाकावी; तेवढाच व्याप कमी झाला. पण इतक्या सुखासुखी हें प्रकरण निभावतें तर आणखी काय पाहिजे होतें ? अगोदर माहिती ऐकून घेण्याच्या मनःस्थितींत एकही पाहुणा नव्हता. कान टवकारण्याऐवजीं प्रत्येकानें आ वासला होता. अन् मी जरा विशेष जोरानें भाष्य करूं लागलोंच तर त्यांच्या 'आ'चें रूपांतर 'ऑ ?'त व्हायचें एवढेंच. आमच्या कुटुंबाच्या गाडींत दुसरी एक सौभाग्यवती बसली होती. आमच्या बाईसाहेबांची जीभ बरीच वळवळ करीत होती त्यावरून व तिच्या हातवाऱ्यांवरून ती-सुद्धां आपलें मुंबईबद्दलचें तुटपुंजें ज्ञान प्रकट करून माझी जबाबदारी कमी करीत असावी हें उघड दिसलें. त्याच गाडींतले छोटे पाहुणेही आपल्या जिभा बाहेर काढून बसले होते. थेट वांद्र्याला पोंचल्यावर त्यांनीं त्या आंत घेतल्या.

दुसऱ्या दिवशीं कळलें कीं, पाहुणे दहा दिवस राहाणार असून प्रत्येक दिवसाचा कार्यक्रम त्यांनीं आंखून ठेवला आहे. सुदैवानें मला तोच दिवस सुट्टीचा होता. त्या दिवशीं सर्व मालिका कुठेंतरी फिरवून आणून नंतर 'साहेब' रजा देत नाहीं असें सांगून दोन्ही खाका वर करायच्या असें मीं ठरवलें होतें! पण एक दिवस झाला तरी तेवढ्यानें माझें पुरतें पीठ पडणार होतें याची मला काय कल्पना? जेवण झाल्यावर पान खाऊन सर्व पाहुणे थोडा वेळ आडवे झाले. मला आशा होती कीं, यांचा डोळ्याला डोळा लागला आहे तो तसाच चोवीस तास लागावा. नाहींतरी झोंपेची जरूर आहेच त्यांना. पण कोंकणची ती बालगोपाळ मंडळी कुठची वडील माणसांना झोंपूं देणार? अर्ध्याच तासांत कपडे घालून सर्वजण सज्ज झाले. आजीबाईंची कंबर धरली असून त्यामुळें बायकामंडळींपैकीं कुणीच यायचें नाहीं असें ठरलें व त्यामुळें माझा अर्धा अधिक जीव भांड्यांत पडला. बाकीचे सर्व नग नीट मोजून—बावळट तरुणानें जवळ एक डायरी ठेवली होती व तींत तो कांहींतरी टिपीत होता—व त्यांत गुंडू-गोदी मिळवून मी जीव मुठींत धरून बाहेर पडलों. वांद्रयाहून थेट चर्चगेटचीं तिकिटें काढलीं. हेतु हाच कीं, निदान अर्धा तास तरी हाशहुश् करायला वेळ मिळावा. पण बराचसा वेळ पुन्हा पुन्हा येणारा घाम पुसण्यांत व कानांत बोटें घालून तोंडानें मुंबापुरीज्ञानाचे फवारे सोडण्यांत गेला. अगोदर गाडींत प्रत्येकाला चढवणेंच मला मुष्किलीचें वाटलें. कारण बिनएंजिनाची गाडी पाहून तमाम बोट सटासट तोंडांत गेलें होतें. म्हाताऱ्यांपैकीं एकाला तर शास्त्रीय ज्ञानांत पडलेली ही भर पाहून इतका उमाळा आला कीं,

त्याचा कंठ दाटून येऊन त्यामुळें त्याला खोकल्याची ढांस लागली. बरें तर बरें, गाडी हलण्यापूर्वी त्याला आंत चढवला.

वांद्रयाहून निघाल्यापासूनच सर्व पोरांनीं मला घेरलें व 'हें काय आहे? -तें काय आहे?' करून भंडावून सोडलें. कत्तलखान्याची माहिती देतांना मी आळीपाळीनें त्या इमारतींकडे व माझ्या पाहुण्यांकडे विमनस्कतेनें पहात होतों. प्रत्येक स्टेशनचें नांव सांगण्याचा पत्कर चि. गुंडूनें घेतला होता. गोदीसुद्धां आपल्या मानेला वळसे देऊन व कुर्रेबाज तोंड करून कांहींतरी बढाया मारीत होती व तीं गरीब बिचारीं गांवठी पोरें मिटक्या मारीत त्या ऐकत होतीं. ग्रँटरोडचें भव्य स्टेशन, घड्याळ व मधून मधून दिसलेल्या ट्रामगाड्या पाहून एका मुलानें बाकावर उभें राहून किंचाळी फोडली. महालक्ष्मी घोडा-मैदान व धोबीघाट मीं रसाळ वाणीनें वर्णिला. तसेंच चर्नीरोडपासून पुढें हार्वेसाहेबानें समुद्र कसा बुजवला हें दाखविलें. म्हाताऱ्यांपैकीं एकानें बंडीचीं उरलेलीं बटनें लावून व मफलर गळ्याला गुंडाळून हार्वे म्हणजे आधुनिक अगस्ती आहे असे उद्गार काढले. मुलांपैकीं एकजण क्वीन्सरोडवरील मोटारी मोजूं लागला; व दुसऱ्या एकानें 'इतक्या मोटारी कुठं निघाल्या?—गव्हर्नरसाहेबांचं लग्न आहे होय?' म्हणून प्रश्न केला.

चर्चगेटला उतरून सर्वांना अपोलो बंदरापर्यंत नेण्यांत मीं माझ्या आयुष्यांतलें सर्वांत बिकट कार्य केलें हें नमूद करायला मला मुळींच लाज वाटत नाहीं. 'गेटवे'पाशीं आल्यावर सर्वजण क्रमानें भिंतीवर बसले. बावळट तरुणानें डायरी काढून नग मोजले व नंतर पेन्सिल तोंडांतच ठेवली. मला प्रथम वाटलें, नगांचा आंकडा बरोबर असल्या-

बद्दलच्या आश्चर्यानें असेल. पण नंतर समजलें कीं तो गृहस्थ ताजमहाल हॉटेलकडे पेन्सिल चोखीत बघतो आहे. सर्वांना बिनचूक आणल्याबद्दल मीही आश्चर्य मानतों आहें तों गोदीनें एक नग कमी झाल्याचें माझ्या नजरेस आणलें व 'धप्प्' आवाज झाला आहे, तेव्हां 'तात्या'च समुद्रांत पडला असावा असा तर्क पुढें मांडला. अर्थात् आमच्यांत एकच हलकल्लोळ उडाला. पण सुदैवानें लवकरच 'तात्या' शेजारचा दगडी पुतळा सकौतुक निरखीत असतांना आढळला व तात्यापेक्षां अधिक भरीव मगज आंत असलेली नारळाची कवटी पाण्यांत पडल्याचा उपरोक्त आवाज होता असें नंतर कळून आलें.

यानंतर जवळचा म्युझियम मीं पाहुण्यांना कसा दाखवला, त्या ठिकाणीं त्यांनीं कसे अनाचार केले, परत जातांना त्यांना गिरगांवपर्यंत ट्रामनें नेल्यामुळें इतर उतारूंनीं कंडक्टरकडे तक्रार कशी केली, वगैरे सर्व सांगत बसत नाहीं. एवढेंच सांगतों कीं रात्रीं घरीं येऊन पोंचलों तेव्हां फक्त तीन हातरुमाल, दोन छत्र्या, एक टोपी व रोख सहा रुपये साडेतीन आणे एवढाच माल कमी झालेला होता. मानवी नग सर्व सुदैवानें कायम होते.

दुसऱ्या दिवशीं एका स्नेह्याच्या हवाली पैशांची मोटली व पाहुण्यांची मुटकुळी करून स्वतः ऑफिसांत पळलों. संध्याकाळीं घरीं आल्यावर चौकशी करतां 'सर्व ठीक' असून फक्त 'तात्या'चें बोट तुटलें होतें असें कळलें. पाहुण्यांनीं त्या दिवशीं राणीच्या बागेंत फेरी मारली होती व तात्यानें अस्वलाच्या पिंजऱ्यांत बोट घातलें होतें.

तिसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मोठ्या आशेनें घरीं आलों. वाटत होतें कीं, एकादा पाहुणा ट्रामच्या रुळावर डोकें ठेवून घरीं आला

असेल. पण तसें कांहीं झालें नव्हतें. पुढें पुढें पाहुणेही चांगले बनले; आणि दहा दिवसांचा कार्यक्रम त्यांनीं बिनबोभाट पार पाडला. मला वाटाड्या स्नेही मात्र रोज बदलून द्यावा लागत असे. ग्रीटा गार्बोबरोबर एकदां काम केलेला नट पुन्हा तिचा नायक होण्यास धजत नाहीं म्हणतात, तसेंच कांहींसें होतें हें.

पाहुणे गेले तेव्हां, गोदी-गुंडूंना नाहीं, पण आम्हां दोघांना तरी हायसें वाटलें. पोरांना वाईट वाटण्याचें कारण, आतां फुशारक्या मारायला मिळायच्या नाहींत !

जाण्यापूर्वीं तात्याची डायरी मला पहायला मिळाली. धोबीतलाव, महालक्ष्मीचें रेसकोर्स, ट्राम व धोबीघाट यांचा त्यानें पुढीलप्रमाणें मेळ घातला होता :—

"झांशीच्या लक्ष्मीबाईनें घोडयावर बसून ज्यांत उडी घेतली तोच हा तलाव. हल्लीं यांत धोबी 'टमरेल' घेऊन कपडे धुतात."



## (८) खाणावळी

रविवारचा दिवस असल्यानें गुंडूला घेऊन वांद्रयाच्या खाडीकडे फिरत फिरत मजेंत जाऊन एका खडकावर बसलों. सूर्य नुकताच समुद्रांत बुडाला होता. सर्वत्र शान्त होतें. फक्त लाटांचा अन् गुंडूच्या वटवटीचा आवाज येई तेवढाच. त्या दिवशीं बरोबर गुंडू होता म्हणून-च मी वांचलों; नाहीं तर खास कविता केली असती. शेजारच्या दुसऱ्या खडकावर बसलेला पिंजारलेल्या केसांचा दुसरा बुवा धरला व आसपासचे चार कोळी सोडले तर आम्ही तीनच मनुष्यप्राणी समुद्रावर होतों. गुंड्यानें जे बरेच प्रश्न विचारले त्यांपैकीं एकानें मी विशेष चमकलों.

गुंडू विचारीत होता, "बाबा, वांद्रयाला नवीन सर्कस आली आहे का हो?"

मी विचारांत पडलों. माझ्या कपाळावर आठ्या चढण्याचें एक कारण असें कीं, निसर्गाचे खेळ पहात असलेलें माझें मन खेंचून एकदम सर्कशीकडे नेणें गुंडूला शोभलें नाहीं. दुसरें असें कीं, सर्कस खरीच उतरली असेल तर चार दोन रुपयांना चाट आली म्हणायची!

"कां रे विचारतोस?" मीं उलट प्रश्न केला.

"नाहीं. मघांपासून वाघाची गुरगूर ऐकूं येते आहे म्हणून म्हणतों. ती पहा, तुम्हांला नाहीं ऐकूं आली?"

मीं कान टवकारले. कांहींतरी 'खुरुक् खुरुक्' येत होतें खरें

ऐकूं. पण तो लाटांचा आवाज असेल असें म्हणून मीं गुंड्याला धुडकावून लावला. पण तें स्पष्टीकरण मला स्वतःलाच पटलें नाहीं. शेवटीं शेजारीं बसलेल्या त्या खिन्न गृहस्थाशीं सिनेमा-सर्कशीबद्दल चार गप्पा मारून त्याला रिझवतां येईल तर पाहावें असा विचार केला. अन् चमत्कार असा कीं, त्याच्याजवळ जाऊन पोंचलों तेव्हां गुरगुरीचा आवाज चांगलाच वाढला होता.

मला पाहून तो गृहस्थ बराच गोरामोरा झाला. नंतर कोर्टांत सर्व बिंग बाहेर आल्यावर गुन्हेगार जशी मुद्रा करील तशा चेहऱ्यानें माझ्याकडे पाहात व एका हातानें पोट दाबीत तो म्हणाला, "खाणा-वळ! खाणावळीचें दुःख आहे हें, महाराज—! तुमच्यासारख्या कुटुंबी माणसाला कल्पना यायची नाहीं——!"

मी त्याच्यापुढें एक धोंडा मांडून त्यावर बसलों, अन् सहानु-भूतीच्या आवाजांत म्हटलें, मला तुझ्या दुःखाची पूर्ण कल्पना आहे; कारण मींही एकदोनदां तुझ्यासारखा खाणावळींत जेवलों आहें. एकदोनदां कां? चांगला १५-२० वेळां असा प्रसंग आला असेल. अगदीं ताजेंच उदाहरण घ्यायचें तर गतवर्षीं छोटू होण्यापूर्वींची गोष्ट. गुंडूला नी गोदीला घेऊन सौभाग्यवती माहेरीं गेली होती, अन् मी एकटाच फकीर आमच्या मशिदींत होतों. खाणावळीचा डबा सुरू केला होता. पण एक तर तो वेळेवर कधीं यायचाच नाहीं. सव्वा नवाची माझी गाडी, तर नऊ वीसला डबा यायचा! एकदोनदां उपाशीं गेलों. मग खाणावळवाल्याचे कान उपटले. अन् शेवटीं हताश होऊन खाणावळींतच जेवायला जाऊं लागलों. नाहींतरी डबा-वाल्याला आठवण करण्यासाठीं खाणावळीपर्यंत रोज चक्कर मारावीच

लागे. तेव्हां तिथें जाऊन पाटावर बसलों तर निदान पोटभर तरी जेवण मिळेल हा उद्देश. पण खरोखर सांगतों; त्या खाणावळींतल्या वातावरणांतून बाहेर पडून स्टेशनांत शिरेपर्यंत माझें मस्तक कसें भणभण करीत असे! स्टेशनाच्या आवारांतच कधीं भडभडून आलें नाहीं हें तिकीट कलेक्टरनें आपलें सुदैव अन् संधि साधून पासा-शिवाय सटकणाऱ्यांनीं आपलें दुर्दैव समजावें.

हें सगळें गाऱ्हाणें मीं त्या गृहस्थाला सांगितलें तेव्हां त्याला आणखीच भडभडून आलें. तो मुकाट्यानें उठला अन् समुद्राकडे जाऊन पांच एक मिनिटांनीं परत आला. त्याच्याविषयीं मला वाट-णारी सहानुभूति या वेळीं इतकी कडेलोटाला पोंचली होती, कीं त्याच्या पाठीवरून हात फिरवीन म्हणावें तर पायच जागचा हलेना.

मात्र परत आल्यावर त्याची गुरगुर थांबली होती. मीं दिलेली लवंग चावून व त्याच वेळीं सर्व खाणावळवाल्यांवर दांत ओठ चावीत तो ओरडला, "कांहीं नाहीं, या लोकांना— सर्वांना— एका पोत्यांत घालून समुद्रांत बुडवलं पाहिजे."

माझ्या संतापलेल्या मनांत असा विचार आला कीं, त्यापेक्षां या लोकांचे तुकडे तुकडे करून जेवणाच्या डब्यांत ते विभागून भरले तर?

तो गृहस्थ 'खडकस्थ' होऊन पुढें म्हणाला, "हुश्! —आतां पुष्कळच मोकळं वाटतं आहे. पण मघाशीं अशी स्थिति झाली होती म्हणून सांगूं!—तरी बरं आहे, दर आठवड्याला खाणावळ बदलतों आहें!—दक्षिणी खाणावळी तेवीस झाल्या; गुजराथी अकरावी सध्या चालू आहे; अन् आतां असं म्हणतों आहें कीं साउथ इंडियन खाणा-वळ जॉइन करावी काय?"

"आपलं कुटुंब वगैरे--" मीं भीत भीत अर्धवट प्रश्न केला.

"मला कुटुंब नाहीं नी बिटुंब नाहीं." त्यानें तिरस्कारानें उत्तर दिलें. "मी जो असा विरक्त दिसतों तो लग्न झाल्यामुळें नसून माझी पचनशक्ति भग्न झाल्यामुळं आहे. कांहीं दिवसांपूर्वी मी साम्यवादी होतों व सर्व उत्पादक धंदेवाल्यांबद्दल मला आदर असे. पण या खाणावळवाल्यांनीं त्याला हरताळ फांसला. वा रे उत्पादक!"

थोडा वेळ आम्ही दोघे विमनस्कपणें बसलों होतों. लाटांच्या झुळझुळ संगीतानें, मला वाटतें, त्याचीं आंतडीं बरींच शमलीं असावींत. कारण कांहीं वेळानें त्यानें माझ्याकडे पुन्हा पाहिलें तेव्हां त्याच्या चेहऱ्यावर जरासा तजेला दिसत होता.

"जाऊं द्या," तो म्हणाला, "आलिया भोजनाशीं असावें सोदर."

"कोणत्या खाणावळींत जेवतां आपण?" मीं विचारलें; अन् मग माझ्या बेअक्कलपणाबद्दल जीभ — कदाचित् सुपारी असेल— चावीत बसलों.

"श्रीशंभू दिग्विजय खाणावळ." त्यानें तुच्छतेचा मुद्राभिनय करून उत्तर दिलें. "हा शंभू कोण असेल तो असो. पण आतांपर्यंत शंभर जिवांची हत्या करून त्याचं पाप गळ्यांत बांधण्याचा दिग्विजय त्यानं केला खरा. आंकडेशास्त्राला धरून हिशेब केला व प्रत्येकाचं आंतडं बारा फूट लांब असल्याचं गृहीत धरलं, तर या भोजनभाऊंनीं आतांपर्यंत एकचतुर्थांश मैल लांबीचीं आतडीं सफा उडवलीं आहेत!

"अहो, काय सांगूं ती खाणावळ! तिथला....केस चापून बसवलेला

तो मॅनेजर, त्याची हातमोडकी खुर्ची नी पायमोडकं टेबल, टेबला-वर जलतरंगाच्या थाटांत ठेवलेल्या त्या लवंग-वेलदोडा-सुपारी-बडि-शेपच्या ताटल्या ! —भोंवतीं सुपारी चघळीत बसलेल्या गप्पिष्ठांचा तो घोळका ! पादत्राणं बाहेर काढावीं म्हणून मारे पाटी लावतो अन् जेवून आल्यावर त्या पादत्राणांच्या उकिरडयांतून आपली वहाण शोधतांना जिकिरीस येतो जीव. एकदां तर पायतान पाहून काढल्या-वर मी इतका थकलों, कीं झकत पाकीट काढून पुन्हा पानावर बसलों नी दुसऱ्यांदा जेवण खाल्लं !– तुम्ही म्हणाल, जेवणाला नांवं ठेवतां नी तेंच जेवण तीनतीनदां जेवतां हें कसं ? त्याला उत्तर एवढंच कीं, पोट दिलं आहे ना देवानं ! बाकी जेवण इतकं गिळगिळीत असतं म्हणून सांगू ! अगोदर तीं कमरेला पोतेरं गुंडाळ-लेलीं गलिच्छ पोरं——"

"आपल्याला...." मीं गंभीरपणें सुचवलें, "खाणावळींतल्या एकं-दर दृश्याचांच जास्ती कंटाळा आलेला दिसतो. मग घरीं डबा मागवून कां नाहीं पहात आपण ?"

"अन् दोन रुपये जास्ती द्यायचे ? –असंही मरायचं नी तसंही मरायचं, मग पैसे कशाला जास्त मोजूं ? शिवाय तोही प्रयोग करून पाहिलाच आहे मीं. पण त्यांत सतरा भानगडी असतात. एक तर पुरतं जेवण नेहमीं असेलच असं सांगतां येत नाहीं. कधीं चार पोळ्या तर कधीं तीनच असायच्या. बरं, तक्रार केली तर दांत दाखवून मोकळा ! शिवाय रोज रोज तक्रार करण्याची 'एनर्जी' आहे कुणांत ?—— मीठसुद्धां चाबायला नियमीत मिळेल तर शपथ ! कधीं तें वरच्या वाटींत असतं तर कधीं तुपांत विरघळलेलं असतं. मुळींच

दिसलं नाहीं तर भाजीचं पृथक्करण केल्यावर तींत नक्की सांपडेल असं डबावाला सांगतो. कारण त्या दिवशीं भाजींत मीठ जादा पडल्याची कानगोष्ट आचाऱ्यानें त्याला सांगितलेली असते. आमटीच्या समुद्रांत कधीं आमसुलाचे मासे पोहत असतात, तर कधीं दाट शेवाळ जमलेलं दिसतं. शिवाय त्यांत पातळ भाजीच्या वाटीचा मचवा अचूक तरंगतांना आढळतोच. समुद्रकांठच्या पांढऱ्या खडपांत काळीं कालवं चिकटलेलीं सांपडावींत तसं भातांत पाखड नी पोरकिडे हटकून सांपडतात; नी अधूनमधून फुटलेल्या जहाजांतला एकादा अभागी जीव मरून त्याचं प्रेत वहात जावं त्याप्रमाणं एकाद्या झुरळाचं प्रेत आमच्याकडे धाडायला आमचा दर्यासागर कमी करीत नाहीं. जेवणापूर्वीं भुकेमुळं जें पोट वखवख करीत असतं तेंच जेवणानंतर बकबक करूं लागतं.

"डब्याचा असा अनुभव आल्यावर विचार केला कीं खाणावळींत पानावर बसलेलं काय वाईट! आपल्यासारखे चार समदुःखी जीव आपोष्णी घेत असलेले पाहून तेवढंच समाधान वाटेल अन् घशाखालीं घास उतरेल. पण त्याहि बाबतींत— सांगतों तुम्हांला— निराशाच वांट्याला येत असते. कारण त्यांच्या गप्पा कसल्या....तर 'आज साहेब खरड काढणार बुवा', 'छे छे आज लेजर भरलंच पाहिजे तेवढं'. अरे लेको, तुमचं चालू मरण विसरण्याचा हाच का मार्ग? पुढें येणाऱ्या मरणाचा जर तुम्ही विचार करीत बसलांत तर आतां तुमच्या जिवांत जीव कसा येईल? आगींतून फुपाट्यांत पडण्यासारखंच तें!"

इतकें बोलून गृहस्थ रुमाल काढून घाम पुशीत बसला. मीही

त्याच्याकडे करुणदृष्टीनें पाहूं लागलों. वाटलें किती भाग्यवंत प्राणी मी, कीं सध्या तरी मला घरचं जेवण मिळतें आहे! सौभाग्यवतीच्या रोजच्या सैपाकांत बारीकसारीक दोष काढण्याची जी वाईट संवय मला लागली होती, तिच्याबद्दल मन शरमेनें भरून गेलें अगदीं— अर्थात् वाचकांनीं यावरून असें मात्र समजूं नये, कीं केलेली टीका बऱ्या बोलानें बाईसाहेब ऐकून घेतात म्हणून! आमची विरोध दाखवण्याची रीत म्हणजे काय, तोंडाची पुटपुट करायची. अन् तिनें भांडीं आपटून "मग तुम्हीच बसा तर चुलीपाशीं, अन् लागूं-द्यात काय दिवे लागणार ते!" असें म्हटलें कीं चीपचाप मूग गिळीत बसायचें. पण अर्थात् या गृहस्थाचें रडगाणें ऐकल्यावर आपली अन्नचिकित्सा किती अनाठायीं आहे, अन् वास्तविक सौभाग्यवती पाकशास्त्रांत खुद्द कंकभटजीला मागें सारणारी कशी आहे तें ध्यानांत आलें व स्वतःच्या अरेरावीपणाची लाज वाटली.

"सगळ्यांत कमाल झाली ती परवां!" तो गृहस्थ एकाएकीं डोळे वटारून लाटांकडे बघत बोलला. "आमटींत एक विलक्षण पदार्थ निघाला. मीं दोन्ही बोटांनीं त्याचे तंतु धरून तो बाहेर काढला. खाणावळवाल्याचा कान धरून त्याला तें दाखवलें तेव्हां म्हणतो कसा—'सर्दीला बरं असतं तें!' इतर जेवणारे तरी कांहीं कींव करतील? —छे! उलट एक निलाजरा म्हणाला, "बरं तर बरं, पुरता मेला आहे म्हणून. जिवंत असता तर तुमच्या ओठांना खाज सुटली असती!"

"म्हणजे होतं तरी काय तें? झुरळ?"

"सुरवंट!" तो किंचाळला "खाणावळीच्या आवारांत एरंडांचं झाड आहे."

मीं 'हूं !' म्हणून श्वास सोडणार तों एक परिचित किंकाळी मला ऐकूं आली. मी धांवतच समुद्राकडे गेलों.

गुंडू कंबरेभर पाण्यांत शिरला असून त्याची तंगडी एका खेकड्यानें धरली होती.

---

# (९) मुंग्या–झुरळें–उंदीर

गोदीनें घेतली केरसुणी, सौभाग्यवतीनें खराटा, गुंडूनें आपली नवी बॅट अन् मीं रेघा आंखण्याचा रूळ. फार काय सांगू, गोधडीवर पडलेला छोटूसुद्धां हातांतलें रिंगणें भीमाच्या गदेप्रमाणें फिरवूं लागला. या सगळ्याचें कारण, रात्रीचें जेवण होतांच मीं मार्शल चांग कै शेकप्रमाणें पुकारा केला होता कीं, "प्रत्येकानें युद्धास तयार व्हावें; बेहेत्तर काय वाटेल तें झालें तरी. पण हा लढा शेवटाला नेलाच पाहिजे !"

आमच्या लढाईचा विषय म्हणजे घरभर आपलें साम्राज्य स्थापण्यासाठीं सोकावलेला एक गलेलठ्ठ उंदीर होता. पुष्कळ दिवस आम्हीं त्याचा छळ सहन केला; पण अलीकडे त्यानें चक्क धान्याच्या पोत्यांतच ठाण मांडल्यामुळें आर्थिक स्वातंत्र्याचा झेंडा आम्हांला उचलून धरावा लागला.

बाकी त्या दिवशींची आमची ती सायुध फलटण पाहून अन् एकंदर वीरश्रीचा नूर बघून कुणालाही Mass Movement कशी असते त्याची खरी कल्पना आली असती. अन् आम्हांलाही त्यावेळीं आत्मविश्वास जबरा वाटत होता. अहो, रशियांतल्या मजुरांनीं एकवटून जिथें झारलाही खालीं आणला तिथें एका उंदराची काय पत्राज ?

पण उंदीर मारण्याचें काम इतकें सोपें नाहीं, याचा लवकरच आम्हांला अनुभव आला. सौभाग्यवतीनें मारे सगळीं दारेंबिरें लावून

टाकलीं होतीं. मोरीच्या वाटे उंदरानें जाऊं नये म्हणून जत्रेंत घेतलेला नवा चेंडू तिथें ठेवून गुंडूनें आपल्या त्यागी वृत्तीची आणखी एक साक्ष दिली होती. मीं बिगुल फुंकतांच सर्व आयुधें चपळाईनें कानाकोपऱ्यांत फिरूं लागलीं. कोळशाच्या घमेल्याआडून उंदराला



कोळशाच्या घमेल्याआडून उंदराला बाहेर काढण्याचें श्रेय गोदीनें मिळविलें व दुसरीकडून फटकारा देऊन त्याला भांड्यांच्या पेटींत घालवण्याचा शहाणपणा गुंड्यानें केला.

बाहेर काढण्याचें श्रेय गोदीनें मिळविलें व दुसरीकडून फटकारा देऊन त्याला भांडयांच्या पेटींत घालण्याचा शहाणपणा गुंडयानें केला. त्याच्या प्रामाणिकपणाबद्दल खात्री नसती तर त्याचा तो अवलक्षणी हात पिरगळून, प्लेगनें यायची नाहीं एवढी गांठ त्याच्या बगलेंत आणण्याचा माझा बेत होता. कारण त्याच्या करणीमुळें सबंध भांडयांची पेटी आम्हांला उपसावी लागली. अन् तरीसुद्धां तो सांपडला नाहींच.

शेवटीं तळच्या भांडयांपैकीं एक चरवी काढून सौभाग्यवती 'अय्या! मला ठाऊकच नव्हतं हो हें भांडं आपल्याकडे आहे म्हणून! बरं झालं, ताकाला होईल.' वगैरे भाष्य बोलते आहे तों चरवींतून पट्दिशीं उडी मारून उंदीरमामा जे बाहेर पडले ते थेट वरच्या फळीवर चढले. फळीवर रचलेले धान्याचे डबे आतां काढावे लागतात काय असा मी विचार करतों आहें, तोंच गुंडयानें मोरीच्या भिंतीवर चढून उंदराची शेपटी बरोबर हुडकली व तिच्यावर बॅटीचा तडाखा मारला. त्यामुळें चीं चीं करीत मूषकराज उडी मारून गुंडयाच्या बाजूला वळले. बिचारा शूर मुलगा दचकून मोरींत पडला. गुंडयाच्या धक्क्यानें तो चेंडूही सरकून बाजूला झाला. उंदरानें ती संधि साधून ड्रेनेजवाटे पलायन केलें असतें; पण इतका वेळ गुंडया मोरींत कसा लोळतो आहे तें पाहण्याच्या उद्देशानें जवळ उभी असलेल्या गोदीनें केरसुणीचा सटकून फटका त्याच्या तोंडावर मारला. मात्र पोरगी जितकी प्रसंगावधानी तितकीच मनानें मऊ! आपल्या मारण्यानें उंदराचे हाल झालेले पाहून तिला राहवेना व 'आपण नाहीं ग बाई जीव घेत बापडयाचा!' म्हणून ती बाजला

झाली. तिच्या बायकीपणाची कींव करीत मी पुढें झालों अन् नेम साधून रूळ हाणला. मात्र दुर्दैव असें कीं उंदीरमामा तेवढयांत माघारे फिरून भिंतीवर टुणकले नी मग पुन्हा फळीवर चढले. अन् तेवढ्यांत गुंडू लोळत जवळ आला होता, त्याच्या बोंडक्यावर माझा रूळ बसून चांगलें मोदकाएवढें टेंगूळ आलें.

नंतर गुंड्यानें भोकांड कसें पसरलें व तो 'हुतात्मा' कसा झाला अन् सौभाग्यवतीनें माझी खरड कशी काढली, तें सगळें सांगायला नकोच. एवढें खरें कीं, यामुळें माझी युद्धाची अर्धी रग जिरून गेली. मग मीं माजघरांत जाऊन स्टूल आणलें व त्यावर चढून फळीवर सर्वत्र शोध केला हें सारें खरें; पण त्यांत कांहीं राम नव्हता. शिवाय, फळीवर संशोधन चालू असतां मूषकराज सफाईनें खालीं आले अन् माजघरांतून येतांना मीं जें गाढवासारखें दार उघडें टाकलें होतें त्यांतून पळण्याचा त्यांनीं प्रयत्न केला. हातातोंडाशीं आलेली शिकार पळून जात असलेली पाहून माझा जीव एवढा एवढा होतो आहे तों आमच्या गुणाच्या गृहिणीनें फटकादिशीं दरवाजा लावला. उंदीरमामा दाराच्या फटींत सांपडले. मी लगेच सांडशी आणून शेपटी चांगली पकडून ठेवली; व गोदीनें जपूनच दरवाजा उघडला —अन् जेव्हां आम्हांला आढळून आलें कीं, फक्त शेपूटच तेवढी सांडशींत ठेवून मामा शस्त्रवैद्याकडे निघून गेले आहेत, तेव्हां एकंदर इंशा अन् माझा तो चेहरा काय विचारतां ! गुंडयादेखील टेंगळाचें दुःख विसरून खो खो हसूं लागला.

या उंदीर-घुशींची शिकार म्हणजे कांहीं चेष्टा नाहीं. कित्येकदां तर एकेक घूस एवढी मोठी असते, कीं तिला मारायला निघाल्यावर

शिकार तिची होईल का आपली, याचीच खात्री नसते. एकादी साळू किंवा अस्वल जवळ येण्यासारखाच देखावा दिसतो, अन् वाटतें कीं, नको रे बुवा ! अशा रीतीनें अंगावर कांटा उभा राहून हुडहुडी भरण्यापेक्षां उंदरांना मोकाट मैदान दिलेलें काय वाईट ? फार तर प्लेग होईल इतकेंच कीं नाहीं ? देवाच्याच मनांत जिथें उंदरांची नी आमची गांठ घालण्याचें आलें तिथें प्लेगच्या गांठीला भिऊन कसें चालेल ?

गुंडयाला मात्र उंदीर मारणें म्हणजे मोठा पराक्रम केल्यासारखा वाटतो. तेवढ्यासाठीं थोडयाफार लबाडीचाही आश्रय करायला त्याला कांहीं वाटत नाहीं. एकदां असाच एक मोठा उंदीर त्यानें शेपटीला धरून आणला, अन् आमच्यापुढें आपटून म्हटलें, "बघितलात ?— याला म्हणतात शिकार !"

एवढया छवी उद्गारांनीं भागलें नाहीं, तर तो असेंही सांगायला कमी करीत नाहीं, कीं आपणच त्याला मोठया कौशल्यानें मारला. अमक्या अमक्या कोपऱ्यांत म्हणे तो झोंप घेत स्वस्थ पडला होता; हूं नाहीं कीं चूं नाहीं. आपण जाऊन हलकेच असा एक रद्दा दिला म्हणतां ! उंदरानें हात हालवला नाहीं कीं पाय हालवला नाहीं. यावर गोदी प्रश्न करते, "का हो राजेश्री, शिकारीला गेलांत ते नाकाला रुमालसे लावून ?" अन् सौभाग्यवती म्हणते, "तरीच आतांशा त्या खोलींत घाण येत होती !"

पण या मुंबईत उंदरांपेक्षांही सतावून सोडीत असतील तर तीं झुरळें. महिन्यांतून एकदां सर्व पेट्या उसपायच्या अन् झुरळजातीला शक्य तितकें नामशेष करायचें हा जातिवंत मुंबईकरांचा क्रम असतो.

या वेळींही सर्व केरसुण्या अन् जोडे उपयोगांत येतात. शिवाय शत्रूची झपाट्याची चाल व जबरी संख्या लक्षांत घेऊन 'पॉयशा'ची मशीनगन तयार ठेवावी लागते. पण खरोखर सांगतों तुम्हांला, जीव जाईतों जिवांत जीव असणारा जगांत जर कोणता प्राणी असेल तर तो बागुर्डाच होय ! धन्य त्याच्या त्या चिकाटीची. त्याचे पंख तोडले तरी तो म्हणेल, 'उडत गेलांत तुम्ही'. एक मिशी तोडलीत तर दुसरीवर ताव देईल. तीन पाय कापलेत तर एकाच पायावर लढाईला तयार होईल. अर्थात् त्याला नक्की पाय किती असतात हें असंख्य झुरळें मारण्यांत अर्धा जन्म घालवला असूनही मला अद्याप माहीत झालेलें नाहीं. एकानें मला सांगितलें, कीं त्यांना धरून घासलेटांत बुचकळावींत. अरे हो, खरें आहे; पण प्रथम त्यांना धराल तेव्हां ना बुचकळणार ?

झुरळ कधीं सांपडून सांपडायचें नाहीं. तुम्ही शिवाशिवी खेळाल तर तो पठ्ठया लपंडाव खेळत असतो ! शिवाय त्यांचा लहान मोठा असा बराच परिवार असल्यामुळें भीक नको पण कुत्रा आवर असें होऊन जातें. पेट्या उपसल्या कीं पहिल्यानें आंत दृश्य दिसतें तेंच मुळीं कमळांनीं भरलेल्या तळ्यासारखें ! कमळें तोडतांना किती प्रयास पडतात याची माहिती गुंडूचा कोळी मित्र बेंडू पुष्कळदां सांगत असतो. पण हीं जिवंत कमळें पकडून त्यांचें निर्माल्य कचऱ्याच्या पेटींत पोंचेपर्यंत जीं अनेक दिव्यें करावीं लागतात, त्यांपुढें बेंडूचे प्रयास कांहींच नव्हत. दोनतीन पेट्यांतलीं झुरळें एकदम काढलीं कीं खोलीला क्षणांत युद्धकाळांतील भूमध्यसमुद्राचें स्वरूप येतें. झुरळरूपी नौकांचा नाश करील पण त्याच वेळीं त्यांच्यापासून आपल्याला इजा होणार नाहीं

याची काळजी घेत हिंडावें लागतें. बरें एका झुरळावर पाय पडला तर त्याच्या मृत्यूनें आनंद व्हायचा तो बाजूलाच राहून उलट 'किच्च' आवाज होऊन किळस वाटते. घासलेटचा सडा टाकावा म्हटलें तर खर्चाचें कांहीं वाटत नाहीं खरें, पण झुरळें मरतील अशीही खात्री नसते. एकदां तर मला आठवतें कीं, केरसुणीचे नऊ फटके मारून नंतर गुंड्यानें चाकूनें एका झुरळाचें पोट छेदलें व नंतर त्याच्यावर घासलेट ओतून अलग त्याला उचलून धगधग-णाऱ्या शेगडींत नेऊन टाकलें. थोड्या वेळानें पहातों तों शेगडीच्या 'खालच्या मजल्या'वरून राखेनें डबडबलेले हे बुवाजी व्यवस्थित बाहेर येऊन हजर! त्या वेळीं फिनिक्स पक्ष्याची आठवण झाली मला.

आणखी दुसरें असें कीं, घासलेट किंवा स्पिरिट यांचा जरा जपूनच उपयोग करावा लागतो. कारण आमचे आगलावे गुंडोजी हातांत काड्यांची पेटी घेऊन सज्ज असतात. केव्हां त्यांची लहर लागेल व घराला भडक वणव्याचें स्वरूप आणण्याची बुद्धि त्यांना केव्हां होईल हें कांहीं सांगतां येत नाहीं.

बरें, या धोक्याच्या गोष्टी घरांत करण्यापेक्षां बाहेर कराव्या म्हटलें तर तेंहि अशक्यच असतें. कारण लगेच फाटकापाशीं फुकटे प्रेक्षक जमूं लागतात व समोरच्या चाळींतून तीनचारशें डोकीं बाहेर येतात. लोकांना फुकटची कसरत करून दाखवायला आपण राजी नाहीं.

उंदीर व झुरळें यांच्याशिवाय प्रत्येकाच्या घरांत आणखीही एक —मानवी शत्रु सोडल्यास— चिमुकला शत्रु थैमान घालीत असतो. अन् तो म्हणजे मुंगी. बाकी ज्या प्राण्यानें हत्तीलाही सळो का पळो

करून सोडलें त्यानें माणसाला सतावून सोडावें यांत नवल नाहीं. सौभाग्यवतीनें "मुंग्या फार झाल्या आहेत" म्हणून बातमी दिली कीं पुढें काय करायचें तें ठरल्यासारखेंच असतें. बाजारांत जातों, 'कटोल' का फटोल काय म्हणतात तें आणतों अन् बाईसाहेबांनीं दर्शवेलेल्या एकूण एक फळीवर, स्टॅण्डवर, फडताळांत, कोनाकोपऱ्यांत व खिडकींत त्याचा असा धुरळा उडवून देतों कीं कांहीं वेळ सौभाग्यवतीला नाकतोंड दाबूनच सैंपाकघरांत हिंडावें लागतें. गुंड्यानें जर कटोलची डबी पाहिली तर खास समजावें कीं डबी आतां आपली नाहीं. कारण 'पटक्' 'पटक्' करीत कटोलचे फवारे सोडण्यांत गुंडूला जी कांहीं गंमत वाटते ती सी. के. नायडूला क्रिकेट खेळतांनाही वाटत नसेल.

खरें विचाराल तर मुंग्यांची मला झुरळाइतकी चीड कधींच येत नाहीं. बिचारे चिमुकले उद्योगी प्राणी, इवले इवले साखरेचे कण घेऊन जर हिंडताहेत तर हिंडेनात का! उगाच तेवढ्यासाठीं डोक्यांत राख घालून घरभर कटोल कशाला शिंपडायचें तें? शिवाय, साखरेचा खाणार त्याला देव देणार म्हणतात. मग देव देत असतांना आपल्यासारखे कर्मचांडाळ जर त्यांच्या तोंडचा घास काढून नेऊं लागले तर तें बरें दिसतें का, तुम्हीच सांगा. आणखी असें कीं, मुंग्या कांहीं तितक्या त्रासदायक नसतात. एरवीं मी सर्व प्राण्यांवर चिडलेला नी वैतागलेला असलों तरी मुंग्यांच्या बाबतींत मला नरम कोपरा आहे. अन्नांत पडल्या तर पडेनात! त्या कांहीं विषारी नाहींत. चवीलाही वाईट नाहींत. छोटू नेहमीं खात असतो. त्याला पुढल्या वर्षी विचारा. येऊन जाऊन इकडे तिकडे हिंडतात हेंच

किंनई ? मग त्यांत आपल्याला त्रास कसला ? आपण पहात बसावें गंमत !

यावर अर्थात् सौभाग्यवती वेडावील : "पहात बसावं गंमत ! तुम्हांला काय बोलायला ? मुंग्या हिंडतात फिरतात त्या सैंपाकघरांत. तुमच्या 'हॉलां'त नाहींत. तेव्हां माझे हाल कसे कळणार तुम्हांला ? तें कांहीं नाहीं. घेऊन या कटोलची डबी !"

आणि कटोलची डबी घेऊन मी घरीं अर्थातच सैंपाकघरांत जातों. नाहीं म्हणायला या बाबतींत एकदांच नकार देण्याचा मीं प्रयत्न केला होता. पण तो फसला. कारण सबबच लंगडी होती.

तें असें झालें. गोदी धांवत येऊन सांगूं लागली, "बाबा, चला कटोल घेऊन. आईनं बोलावलं आहे."

"कां ग ?"

"मुंग्या झाल्या आहेत."

मीं चाचरत म्हटलें, "येत नाहीं म्हणून सांग जा."

"कां हो ?"

मला उत्तर सुचेना. मी पायांवरून हात फिरवला अन् विजयी मुद्रेनें म्हणालों, "सांग जा– मुंग्या आल्या आहेत."

## (१०) वक्ते, श्रोते व व्याख्यानें

गांधीजयंति असो अगर टिळकांची पुण्यतिथि असो, कांहीं लोक असे असतात कीं अशा प्रसंगीं 'भाषण' केल्याशिवाय त्यांना रहावतच नाहीं.

एक वेळ स्मशानयात्रेलाही मी मोठ्या आनंदानें जाईन— म्हणजे अर्थात् वरून खूपसें दु:ख दाखवीत— पण व्याख्यानाला जायचें म्हटलें कीं मला मळमळायला लागतें. तासन्‌तास स्वत:चा घसा फोडून हे वक्ते लोक दुसऱ्याचे कान किटवण्याचें पाप कशासाठीं करीत असतात हेंच मला समजत नाहीं. काय म्हणे, अमुक अमुक तत्त्व लोकांच्या मनांत बिंबवायचें आहे ! अरे पण लेको, तुम्ही मग पुस्तकें कां लिहीत नाहीं ? चारआठ आणे खर्च करून विकत घेऊं आम्ही अन् बसूं आरामखुर्चींत. पण हा दोन तास जीव उकडण्याचा ताप कशाला ? तुम्हांला काय असें वाटतें होय, कीं सभेंत वक्तृत्वाचे फवारे सोडले म्हणजे तत्त्वें बिंबलीं जातात ? असें वाटत असेल तर मी दगडावर लिहून देतों तुम्हांला, कीं तुमची समजूत चुकीची आहे. खरा प्रकार असा असतो कीं, या वक्त्यांचीं व्याख्यानें त्यांच्या स्वत:इतकीं दुसरा कोणीच मन लावून ऐकत नाहीं. अन् ही गोष्ट वक्त्याच्या लक्षांत न येण्याचें कारण एवढेंच, कीं स्वत:चें भाषण स्वत:च्याच 'भेज्यां'त भिरीभिरी करीत असल्यामुळें त्याचें डोकेंच ठिकाणावर नसतें. अन् तारतम्यभाव कळण्याइतकें त्याला भान राहत नाहीं.

तत्त्व पुढें मांडणारा वक्ता हा 'असायलम्'मधल्या वेड्याप्रमाणें असतो. तो सांगतो खूप, कीं इतरांसाठींच आपण बोलतों आहों. वास्तविक स्वत:साठींच त्याचें सर्व भाषण चाललेलें असतें. अन् श्रोते लोक त्याच्या खिजगणतींत नसतात. याचें उत्तम उदाहरण म्हणजे गेल्या आठवडयांत 'समाजोद्धार हॉल'मध्यें 'साम्यवादा'वर एका चष्मेवाल्यानें व्याख्यान दिलें. शेवटीं आवेशाच्या भरांत त्यानें इतक्या जोरानें टेबलावर बुक्की मारली, कीं त्यामुळें टेबलाचा खिळा बोचून त्याच्या हातांतून रक्त वाहूं लागलें. या जखमेमुळें स्वारी शुद्धीवर आली अन् सभोंवार पाहून गोंधळून म्हणाली, "तुम्ही सगळे कशासाठीं जमलां आहांत? ही लढाई आहे काय?—माझ्यावर कोणीं गोळी झाडली काय?"

नाहीं, कोणी गोळी झाडली नव्हती. पण माझें खरें मत विचाराल तर या लोकांवर सटासट गोळ्याच झाडल्या पाहिजेत. मेंदू ताळ्यावर नसतांना वाटेल त्यानें उठावें नी व्याख्यान द्यावें म्हणजे तरी काय? अन् आम्हीं आमच्या झोंपा टाकून गृहिणींचे शाप खात यांची वटवट ऐकायला गेलों तर सवाल असा, कीं म्हणे 'तुम्ही कशाला जमलां आहांत?' म्हणजे बेशरमपणाची कमाल किती तें पाहा.

अर्थात् कांहीं वक्ते आक्षेप घेतील कीं तुम्हांला काय लागतें सांगायला पुस्तकें लिहा म्हणून! पुस्तकें लिहून घेणार आहे कोण विकत, अन् साक्षर लोक आहेत किती हिंदुस्थानांत? मी म्हणतों, नाहीं घेतलीं पुस्तकें कोणीं! तरी तुमचा भेजा तर शांत होईल? तुमची खुमखुम तर जिरेल. कांहींतरी केल्यासारखें तर वाटेल तुम्हांला! देशकार्य केलें—अगदीं पांढऱ्यावर काळें होऊन कोरलें गेलें, आतां

आपण स्वस्थ बसलों तरी चालेल, अशी तर एकदांची समजून होईल तुमची ? अन् अशी तुमची समजूत होणें यांतच आमचें कल्याण आहे.

शिवाय पुस्तक लिहिलेंत अन् तें खपलें नाहीं, तरी पुढें मागें एकादा बुड्ढा संशोधक तरी तें उकरून काढील. अन् मग त्याला काम दिल्याचें पुण्य तरी तुम्हांला मिळवतां येईल.

आणि त्यांतून तुम्हांला फोडायचाच असेल घसा तर रेडिओं-तून कां नाहीं ओरडत ? आतां घरोघर रेडिओ झाले आहेत तेव्हां कसा झकास प्रचार होईल मतांचा. शिवाय, त्यामुळें तुमचे ते हात-वारे नी खप्पड चेहरे आम्हांला दिसायचे नाहींत, अन् आमच्या डोळ्यांवर आलेली झांपड किंवा आगामी निद्रेमुळें वासलेलीं आमचीं तोंडें तुमच्या वखवखणाऱ्या तोंडांना आळा घालण्याचें पाप करणार नाहींत. बिनदिक्कत बोलत राहा. लहर लागेल तोंवर ऐकूं; नंतर चावी फिरवून गप्प बसूं. जोंपर्यंत तुमच्या ओरडण्यानें रेडिओचें यंत्र फुटत नाहीं तोंपर्यंत आमची कांहीं तक्रार नाहीं.

बरें, बोलतील बोलतील तें तरी किती विषयांवर ! त्याला कांहीं काळ नाहीं, वेळ नाहीं आगा नाहीं नी पिछा नाहीं. एकाद्या पुढाऱ्याची पुण्यतिथि अगर जयंति आली कीं माझा जीव घाबराघुबरा होतो तो यामुळेंच. कारण गल्लोगल्लीं नी नाकोनाकीं सभा नी व्याख्यानें ! वक्ते बोलताहेत नी श्रोते ऐकण्याचें ढोंग करताहेत. तोंडाची वाफ दवडण्यापेक्षां यांपैकीं बरेचसे वक्ते जर थोडेंसें खरेंखुरें कार्य करीत कॉलऱ्यानें मेले तर त्यांची पुण्यतिथि साजरी करायला मी एका पायावर तयार आहें.—मात्र भाषण बिषण नाहीं करणार अर्थात् !

कम्युनिस्ट पुढाऱ्यांना वाटतें कीं, 'अहाहा, किती श्रोते आपण

नुसते मंत्रमुग्ध करून सोडले आहेत !' वास्तविक बरेचसे श्रोते डुलत नसून पेंगत असतात. अन् मुग्ध असण्याचें कारण असें कीं ती 'मार्क्स' अन् 'क्लास वॉर'ची भानगड त्यांना कांहींच समजत नाहीं. तेव्हां नुसता आ वासून गप्प बसणें त्यांना श्रेयस्कर वाटतें. प्रागतिक पुढारी जेव्हां भाषण करतात तेव्हां श्रोते बहुतेक सुशिक्षित असल्यामुळें वर वर तरी ध्यान देऊन ऐकण्याचा ते आव आणतात व ज्यांच्या नाकावर चष्मे असतात ते मधून मधून कांचा पुसून डोळे बारीक करीत गंभीरपणें इकडे तिकडे बघतात. कांहीं जणांची पेन्सिल नोटबुकांत भराभर टिपणें करण्यांतही दंग असते. कारण प्रागतिकांच्या गाढ ज्ञानाबद्दल कधींही व कोणीही शंका घेण्याचें कारण नाहीं.

असल्या 'अमक्या हॉल' अन् 'तमक्या लॉज'मधल्या सभांना जाणें तर मला बिलकूल पसंत नाहीं. कारण श्रोतृवर्ग थोडा असल्यानें मधून उठतां येत नाहीं, व विषय पुष्कळदां किचकट असल्यानें तो समजला नाहीं तरी नंदीबैलासारखी मान हलवीत बडबड ऐकावी लागते. त्यापेक्षां आझाद मैदानावरच्या 'प्रचंड' सभा नी 'दणदणीत' भाषणें शतपटीनें बरीं. कारण पायांना मुंग्या आल्या कीं शतपावली करतां येते व वक्त्याचें तोंड सुटलेलें पाहून आपल्यालाही जर स्फूर्ति झाली तर मांडी ठोकून गप्पा मारतां येतात किंवा भेळ-काबलीवाल्याला बोलावतां येतें.

कांहीं लोक तर जन्मजात वक्ते म्हणूनच प्रसिद्ध असतात. उदाहरणार्थ— जाऊं द्या, नाहींच सांगत. सौ पासून सुरवात होणारें नांव होतें तें. पण कशाला बोला ! घरोघर मातीच्याच चुली !

पण खरोखरीच कांहीं बहाद्दर असे आहेत, कीं त्यांची बकोटी धरून त्यांना आयत्या वेळीं उभें केलें नी म्हटलें 'बोल!' कीं असे बोलूं लागतात कीं जसा गंगेचा प्रवाह! मग 'बैस' म्हटल्याशिवाय कधीं बसायचे नाहींत खालीं. आमचे कोपरकर वकीलच घ्या. हल्लीं प्रॅक्टिसमुळें त्यांना वेळ होत नाहीं— निदान ते असें सांगतात. पण एका काळीं ते शीघ्र वक्ते म्हणून प्रसिद्ध होते. त्यांना म्हटलें 'पानपतच्या युद्धावर' बोला म्हणून, कीं स्वारीनें खडाखडा बोलायला सुरवात करायची ती 'शिवाजी महाराजांनीं यंव केलें नी त्यंव केलें' पासून थेट 'आज आम्ही असे कां?' पर्यंत. म्हणजे गृहस्थ विषयाला धरूनच बोलायचा असें नाहीं, पण—बोलायचा!

युद्धाचीं कारणें नी परिणाम नाहीं आठवले, तरी शिवाजी महाराज तर आठवतात! तो सिंहगड, तो सय्यद बंडा, ते विश्वासराव नी तो 'भाऊ-भाऊ!' आक्रोश अन् 'अमुक मोहरा गळाल्या'—हें तर सारें आठवतें? झालें तर! सगळ्याची खिचडी करून श्रोत्यांपुढें एक कोडें टाकायचें: समजा, युद्धच नसतें झालें तर? अरे, गृहस्था, युद्धच नसतें झालें या म्हणण्यांत काय अर्थ आहे? 'आत्याबाईला मिशा असत्या तर—' असें बोलण्यांत हांशील आहे का कांहीं? तुला सांगितलें होतें युद्धावर बोलायला, अन् तूं आलास घसरून शान्ततेवर! बरें, तुझ्या म्हणण्याप्रमाणें नसतें झालें युद्ध, तर काय मोठी धाड झाली असती? इतकीं माणसें मेलीं नसतीं! — पण तूं असा सरळ मीमांसा करायचा नाहींस. तूं म्हणशील कीं तें मग असें झालें असतें, मराठ्यांचा झेंडा या बाजूला फडकला असता अन् त्या बाजूला कांहीं निराळीच लढाई झाली असती. एक नाहीं, दोन

नाहीं, सतरा तर्क तुझे. बोलून चालून न घडलेल्या गोष्टींवर रामायण रचायचें अन् बसायचें विचारीत–रामाची सीता कोण ?

म्हणजे असें नका समजूं कीं मराठ्यांचा झेंडा सगळीकडे फडकला असता तर आम्हांला वाईट वाटलें असतें ! आम्हांलाही अभिमान आहे, अन् मराठेपणाचा मक्ता तुला एकट्याला कुणीं दिलेला नाहीं. माझें म्हणणें एवढेंच कीं लंबेचवडे तर्क काढून 'जर नी तर—'च्या गोष्टींनीं कशाला डोकें भंडावतोस ?

ज्यांना व्याख्यानें द्यायचीं आहेत व बिचाऱ्या भोळ्या श्रोत्यांना



म्हणजे असें, कीं, गणेशोत्सवांत दंतरोगावर चिकित्सा करूं नये.

सतावायचें आहे त्यांनीं निदान काळ वेळ पाहून तरी बोलावें. म्हणजे असें कीं, गणेशोत्सवांत दंतरोगावर चिंकित्सा करूं नये. श्रीगण-रायाच्या दांताच्या लांबीवरून विषयाचें महत्त्व तुम्ही अजमावीत असाल तर बोलणेंच खुंटलें. मग तुमचें क्षेत्र आणखी थोडें व्यापक करून 'कारवारांतील हत्तींचे कळप' किंवा 'महारथी कर्ण' (अर्थात् गणपतीच्या कर्णविशेष औदार्यावर हा विषय आधारला आहे) किंवा 'पाखडण्याचें सूप' व 'पिण्याचें सूप' (याचाही संबंध दूरान्वयानें कानांकडे पोंचतो) इत्यादि इत्यादि विषयांवर कां नाहीं बोलत ?

मला पक्कें आठवतें कीं एकदां कुठेसें 'वस्त्र-प्रावरण-प्रदर्शन' भरलें होतें. त्यांत इतरही थोडेफार करमणुकीचे उपप्रकार होते अन् यांतच व्याख्यानाचा समावेश केला होता. वास्तविक बडबड कर-ण्याचा तो प्रसंगच नव्हता— फक्त साड्या अन् कापडचोपड घ्यायला ज्या भगिनी आल्या होत्या त्यांचीच बडबड तेवढी आव-श्यक ठरली असती. पण जेव्हां का व्याख्यानांचा कार्यक्रम ठरला तेव्हां भराभर अर्ज येऊं लागले कीं, मी अमक्यावर बोलतों, तो तमक्यावर बोलतो. अर्थात् व्यवस्थापकांनीं लगेच कार्यक्रम बाद करून टाकला. पण तात्कालिक कारण असें झालें कीं एकानें विषय सुचवला : 'नग्नसंघाची आवश्यकता' !

तेव्हां बडबड करा तुम्ही. माझें म्हणणें एवढेंच कीं ती बडबड ऐकायला चार गाढवलोक जमले आहेत हें लक्ष्यांत ठेवा अन् त्यांचा अंत पाहूं नका. वसंतोत्सवांत जमलेले लोक आपल्या आयु-ष्यांत प्रसन्नतेचा प्रकाश शिरावा म्हणून आलेले असतात. त्यांना बिचाऱ्यांना 'दुःखान्तिकेचे उपयोग' किंवा 'जग हें मिथ्या आहे'

वगैरे डोस पाजून दिव्याखालचा अंधार दाखवूं नका.

माझ्या सुशिक्षित बहिणींनाही माझें हेंच सांगणें कीं, गौरी-सारख्या मंगलप्रसंगीं तुमच्या जुन्या चालीच्या पोक्त सनातन मैत्रिणी भोळ्या आशेनें व्याख्यानाला आल्या तर आयत्या वेळीं केशवपना-वर बोलून त्यांचा केसानें गळा कापूं नका. तुम्हांला मारे वाटत असतें कीं, वा! सनातन स्त्रियांना योग्य असाच विषय आपण काढला. खरी गोष्ट अशी असते कीं त्यांना तुमच्या त्या कायम-ठशाच्या । ऐकण्याची मुळींच जरूरी नसते. उलट तुमच्या चर्पट-पंजरीनें कंटाळून त्यांच्यापैकीं बऱ्याच जणींना 'आज आपली चांग-लीच × × × झाली' असें वाटल्याशिवाय राहत नाहीं. तसेंच आणखी सूचना अशी, कीं साहित्यावर बोलूं नका. मला वाटतें, श्रोते आजकाल बरेच शहाणे झाले आहेत त्यामुळें साहित्यिक लोकांचीं भाषणें ऐकायला ते फारसे जात नाहींत!

तसें वर्षांतून एकादें व्याख्यान ऐकायला मी जातों. नाहीं असें नाहीं. पण तें तसाच कोणी राजकीय पुढारी असेल तर. एरवीं सारीं व्याख्यानें बाद (Taboo)! शिवाय जातों तेव्हां गुंडूला केव्हांही नेत नाहीं. अन् अशा रीतीनें जाणूनबुजून व्याख्यात्यावर डोंगरा-एवढे उपकार करून ठेवतों. हे उपकार फेडण्यासाठीं म्हणून वक्त्यांनींही उलट लक्ष्यांत ध्यायला पाहिजे कीं, श्रोते लोकांना जसे कान आहेत, तसे कानाच्या आंत नाजूक पडदे सुद्धां आहेत. पण म्हणतात ना, एक वेळ गुंडूसारखा पोरगा सभेंत व्यत्यय आणूं लागला तर त्याचाही हात धरतां येईल पण बोलणाराचें तोंड कुणीं धरावें?

—+—

# (११) चौपाटी

वांद्र्याच्या आसपास फिरायला चांगली जागा नाहीं म्हणून कंठ शोष करणारांचें मला नेहमीं नवल वाटतें. चक्कर मारायचीच अशा निश्चयानें जो वांद्रेकर बाहेर निघाला आहे त्याला मन रिझवायला इथें काय थोडीं ठिकाणें आहेत ? तो भाविक मनाचा ख्रिस्ती असेल तर एक मेणाचा पाय नी नारळ घेऊन व स्वतःचे पाय खंबीर अन् भेजा थंड ठेवून मठमाहुलीचें उंच टेकाड चढेल; हळव्या हृदयाचा हिंदु असेल तर सुखाचा— कधीं कधीं दुर्दैवानें गुंडूचा— शोध लावण्यासाठीं खाडीवर घिरट्या घालील; अन् कडवा मुसलमान असेल तर नकळत त्याचे पाय कत्तलखान्याकडे वळतील. संध्याकाळीं करमणूक म्हणून करायला इतक्या गोष्टी वांद्र्याला असतांना जे 'हपिशी लोक' मुंबईहून येतांना मुद्दाम चौपाटीवर 'पाय मोकळे' करायला उतरतात त्यांची कींव करावी तितकी थोडीच ! बिचाऱ्यांना एवढेंही कळत नाहीं कीं पायांबरोबर चौपाटीवर खिसेही चटदिशीं मोकळे होतात. (त्यासाठीं तुम्हींच दोन पैशांची काबली घ्यायला हवी असें नाहीं. सबंध पाकिटाची चटणी उडवायला कांहीं लोक तयारच आहेत ! )

बरें, चौपाटींत असें आहे तरी काय विशेष, कीं त्यासाठीं उपनगरांतल्या लोकांनीं देशाभिमान सोडून चर्नीरोडला जावें ? बारीक वाळू आहे म्हणतां ? पण नुसती बारीक वाळू घेऊन काय गिळायची आहे ? —अन् तशी ती गिळायची असेल तर आमच्या माहीम-

वांद्र्याच्या खाडीवर खडक, खेकडे नी शेवाळ नीट चुकवलें तर वाटेल तेवढी वाळू मिळेल. तुम्ही म्हणाल, आम्ही वाळूंत पडायला जातों. ठीक आहे, पडा. पण पडायला सुद्धां आमच्या खाडीवर गेलांत तर काय होईल ? फार तर खडक बोचेल अन् खेकडे चावतील इतकेंच ना ? पण निदान माणसाच्या लाथा खाण्याचा तरी प्रसंग येणार नाहीं. भिकूभटजी प्रथम कोंकणांतून आले तेव्हां मीं एकदां मुद्दाम त्यांना चौपाटी दाखवायला नेलें होतें. त्यांना बिचाऱ्यांना ती बारीक रेती पाहून आंडिवऱ्याच्या 'देवाच्या खोली'ची आठवण झाली; व ते अंमळ डोळे मिटून आडवे झाले. छप्पनजणांच्या लाथा खाऊन थोड्या वेळानें भटजी उठले ते व्हिक्टोरिआंत! मीं त्यांना सावरून धरलें होतें म्हणून बरें झालें. वाटेंत कोपरकर वकील भेटले; ते म्हणाले, "चौपाटीवरून आलांत .काय ? छान, छान !—अं: ! थोडा वेळ ठणकेल आंग. पण एकंदरींत तें चांगलं. अशीच चंपी करून घ्यावी."

दुसरें, तुम्ही म्हणाल सूर्यास्ताचे रंग बघायला मिळतात, नी म्हणे लाटांची झुळझुळ ऐकायला मिळते. होय, तें मिळत असेल तर कांहीं वाईट नाहीं; अन् त्यासाठींच गिरगांव भुलेश्वरच्या तमाम सहृदय माणसांनीं चौपाटीवर फिरण्याचा विडा उचलला असावा असेंच कोणीही म्हणेल. पण प्रत्येकानेंच असा पण केल्यानें होतें काय, कीं सूर्याचें तोंड दिसायचें बाजूलाच राहून एकमेकांचींच तोंडें पाहण्यांत नी उचललेला विडा चघळण्यांत वेळ जातो. अन् गुलाबी नारिंगी सरबतांचे ग्लास प्याल्यानंतर मार आठवण होऊन आकाशाकडे नजर टाकावी तों रंगांची पेटी घेऊन

निसर्गाच्या चित्रकारानें केव्हांच काळें केलें आहे असें दिसून येतें. शेवटीं निराशेनें गवर्मेंट हौसचा तांबडा दिवा नी शेवरोलेटची निळ्या प्रकाशांतली जाहिरात यांवरच आपली रंगाची हौस भागवावी लागते.

लाटांच्या धिंग्याबद्दल तर विचारूंच नका. आसपास भेळ-काबलीवाल्यांचा आरडा इतका चालू असतो नी रामभरोसे अन् लक्ष्मणप्रसाद यांचीं एकमेकांना इतक्या आवेशानें आव्हानें मिळत असतात अन् बावडीवाला गोड्या पाण्याची इतके वेळां आठवण करतो कीं बिशाद काय आहे त्या लाटा तुम्हांला ऐकूं येण्याची ? एकदां सुदैवानें मला एक मिनिट असें मिळालें होतें कीं ज्या वेळीं एकही भेळवाला ओरडला नाहीं, एकाही नारळावर कोयत्याचा घाव बसला नाहीं, एकही शेपटावाली मुलगी 'काय मेल्याचें तोंड तरी !' इत्यादि इत्यादि बोलत जवळून गेली नाहीं, व एकाही पोरानें पत्र्याच्या बादलीवर फावडें आपटींत आईच्या नांवानें टाहो फोडला नाहीं. मी मोठ्या आशेनें लाटेकडे पाहूं लागलों. आली — आली — जवळ आली — आतां ती फेसाळणार, सबंध वाळूवर पखरण घालणार अन् मग 'झुलुक्क झुलुक्क' आवाज येणार. पण आशा फोल ठरली नी सगळ्यावरच पाणी पडलें. शेजारीं अटीतटीचा सामना चालल्याचें मी विसरून गेलों होतों. त्यांतून एकदम आवाज निघाला — "हू ऽऽऽऽऽऽऽऽऽऽऽऽऽ तुतुतुतु— "

म्हणजे सांगायचें काय, कीं क्षणभर आनंद मिळावा म्हणून तुम्ही–तुम्हीच काय ? प्रत्येक जण—चौपाटीवर जातो. अन् त्याच वेळीं दुसरा प्रत्येक जण तुमच्या आनंदांत विरजण घालायला टपलेला

असतो. एकदोनदां सुट्टीच्या दिवशीं मीं सर्वांना हौसेखातर चौपाटी-वर नेलें होतें खरें, पण दोन्ही वेळां मला असें झालें कीं कुठून हा बूट काढला! कारण, गोदी शिंपल्या वेंचण्यासाठीं माझा एक बूट घेऊन समुद्राच्या कांठाकांठानें हिंडायची तर दुसऱ्या बुटाभोंवतीं वाळूचा डोंगर उभारून हातांत भगवा (मळका) रुमाल घेऊन गुंडू त्याच्याभोंवतीं गस्त घालायचा. यांपैकीं दुसऱ्या खेपेस गुंडूनें आपल्या सुपीक डोक्यांतून कांहीं शक्कल काढून रेती उकरण्यास सुरवात केली. सौभाग्यवतीला वाटलें, बरें पोर रमलें आहे. मलाही वाटलें कुठेंतरी जादूगाराचा खेळ पहायला जाण्याऐवजीं किंवा टिळकांच्या पुतळ्यावर चढण्याऐवजीं किंवा हुतुतूच्या सामन्यांत आगांतुक सामील होण्याऐवजीं पोराचा हा श्रमजीवी उद्योग खरोखरीच चांगला आहे. तेव्हां गोदू जमवलेल्या शिंपांनीं एक कुठलासा विचित्र खेळ खेळूं लागली आणि मी व सौभाग्यवती पहिल्या ओळखीच्या गोष्टी बोलूं लागलों. अर्ध्यापाऊण तासानें पहातों तों गुंडू हात झटकीत आमच्याजवळ येऊन बसला अन् गोदीनें शिंपला रुमालांत बांधून बूट मला आणून दिला. गुंडूला मीं आश्चर्यानें विचारलें 'अरे, इतका वेळ खड्डा खणलास तो आहे कुठें?' तर गोदीच आपली नाकावर बोट ठेवून डोळा बारीक करते! दुसऱ्याच क्षणीं एक लठ्ठ भाटिया गृहस्थ भेळ खात खात जो आला तो धबदिशीं खालीं! हत्ती कसे पकडतात तें गुंडूनें कुठें तरी वाचलेलें असावें—किंवा त्याला कोणीं सांगितलेलें असावें. पोरगें कसचें वाचणार?— अन् आतां स्वारीनें हा धडा गिरवला असावा! मग पुऱ्यांचे नी काकडीचे तुकडे व कागद बाजूला करीत त्या लठ्ठ गृहस्थाला कसातरी हुडकून



दुसऱ्याच क्षणीं एक लठ्ठ भाटिया गृहस्थ भेळ खात खात
जो आला तो धबदिशीं खालीं !

काढला खरा अन् कांहीं वेळानें प्रेक्षकवृंद मोकळा झाला हेंही खरें; पण त्यामुळें मला नी तिला काय झालें असेल ?—तुम्हीच कल्पना करा !

आमचा एक दोस्त देसाई क्वचित्प्रसंगीं चौपटीवर फिरकलाच तरी वाळूंत कधीं बसायचा नाहीं. तुमानीची क्रीज दोन्ही हातांनीं सावरीत बांकावर बसेल आणि पॅरिसला 'प्रोमेनाद' का 'बुलेवार्द' कायसा आहे त्याचें वर्णन करील. याच्या उलट आमचे दाजीसाहेब

चौपाटीवर गेले कीं असे प्रशास्तपणें बसतात, कीं जणूं कांहीं त्यांचें घरच. आसपास कितीही धामधूम झाली, चार नवे किल्ले उठले व पांच पडले, अगर पंचवीस विहिरी खोदल्या गेल्या किंवा हिंदुस्थानचे भावी गामा-बुरुड कुस्ती खेळूं लागले तरी दाजीसाहेबांच्या तें गांवींही नसतें. मी ज्या वेळीं कलकलणारें डोकें दोन्ही हातांनीं दाबून धरीत असतों त्या वेळीं डाव्या हाताच्या तळव्यावर डोकें ठेवून उजव्या हातानें आविर्भाव करीत दाजीसाहेब कुठलेंसें गाणें गात असतात. मला अशी चीड येते त्यांची ! सूर्यबिंबाला लाजवणारे लालभडक डोळे करून मी त्यांच्याकडे पाहूं लागतों. पण गृहस्थाचें हूं नाहीं कीं चूं नाहीं ! माझी खात्री आहे कीं अशा स्थितींत आसपासचीं दोनतीन पोरें येऊन त्यांच्या पोटावर, डोक्यावर नी पायांवर विभागून बसलीं तरी दाजीसाहेब गातील : आकाशांत फुलें, धरेवर फुलें—बदमाष !

चौपाटीच्या इतिहासांत संस्मरणीय प्रसंग कांहीं वर्षांपूर्वी— मला वाटतें, २९ किंवा ३० सालीं—आला होता. सिंहस्थाचे दिवस होते. नाशिकहून साधूंचा तांडाच्या तांडा जो निघाला तो आस्ते कदम मुक्काम करीत मुंबईला येऊन ठेपला. ताजमहाल हॉटेल, सरदारगृह, वगैरे ठिकाणीं दरांची चौकशी केल्यानंतर....मला वाटतें त्यांनीं फट-दिशीं चौपाटीच पसंत केली. साधूच ते ! त्यांना काय कमी ! 'हल्लक हल्लक' केलें, हवेंत त्रिदंड फिरविले, आणि जेहेत्ते सकाळच्या आंत इकडची सृष्टि तिकडे करून टाकली. सहल करायला छडी घेऊन किंवा पोहण्यासाठीं टॉवेल घेऊन आलेल्या लोकांनीं चकित होऊन छड्या व टॉवेल तोंडांत कोंबले, इतकेंच काय पण विल्सन कॉलेज-समोरचा रस्ता झाडायला आलेल्या मेहतरणीसुद्धां थक्क होऊन हा

प्रकार पाहूं लागल्या. कारण रस्त्यावर एकाएकीं कचऱ्याचा पाऊस पडणें हा तरी काय थोडा चमत्कार झाला ? हां हां म्हणतां आख्खी चौपाटी साधूंनीं व्यापून गेली. कुठें लहानमोठ्या राहुट्या उभारण्याचें काम चालू आहे, कुठें कोणी असाधारण योगी समुद्रस्नान करीत आहे, कोणी अंगावर भस्म चर्चीत आहे, कोणी आल्यागेल्या भाविकाला कसलासा उपदेश करीत आहे, कोणी 'आम्हांला कशाला, आम्हांला कशाला ?' करीत केळ्यांचे घड नाकारून बाजूला फेकीत आहे व तिथें बसलेला शिष्य ते व्यवस्थित लावून ठेवीत आहे ! मीं एक दिवस मुद्दाम फेरफटका मारून हा सर्व देखावा पाहिला नी मला कसें भडभडून आलें ! आशा वाटली कीं, यांतला एकादा तरी पापभ्रष्ट योगी या पाप्याला मार्ग दाखवील ! पण कसचें काय नी कमंडलूंत पाय !– हो, करतां काय ? जिकडे तिकडे मुळीं कमंडलू, त्रिदंडे, चिमटे नी चिरगुटें पसरलेलीं. त्यांतून मार्ग निघेल तेव्हां ना मोक्षाचा मार्ग दिसायचा ! बरें तर बरें. एका साधूनें बरेंच मोठें विवर केलें होतें, त्यांत पाय घसरून पडलों नाहीं. नाहीं म्हणजे स्वत:ची तशी हरकत कधींच नाही, पण गुंडू मिळवायला लागेपर्यंत——

शेवटीं विमनस्क होऊन हात हालवीत अन् डोकें फिरत होतें तें सावरीत मी त्या भूलभुलैयांतून निसटलों नी स्वत:शीं 'हेच का आमचे आधुनिक वसिष्ठ ? यांनाच का म्हणायचें साधु संत ?—कां म्हणून पोसायचें यांना ?—' वगैरे सवाल करीत पायरस्त्याला लागलों अन् त्याच क्षणीं चणेवाल्याची "गिर्राम-गिर्राम" अशी मधुर लकेर कानांवर पडली. लगेच एरवीं त्याच्यावर चिडणारा नी वैतागणारा मी— झटदिशीं खिशांत हात घातला नी एक आण्याची कावली घेऊन खाल्ली.

पण कांहीं असो, चौपाटींत कितीही दोष असोत, पांढरपेशा मुंबईकरांचे पाय तिकडे वळल्याशिवाय राहात नाहींत एवढें मात्र खरें. मुंबई म्हटली कीं चौपाटीची आठवण व्हायला उशीर लागत नाहीं. मुंबईचें तें एक मुख्य अंग आहे असेंच म्हणा ना? त्यांतून गिरगांव भुलेश्वरकरांना तर 'फिरायला जाणें' व 'चौपाटी' या दोन गोष्टींची सांगडच घालण्याची संवय पडली आहे. याचें कमाल उदाहरण द्यायचें म्हणजे रंगरावाचें. रंगरावाला चौपाटीशिवाय इतरत्र कुठें फिरायला गेलेला मीं पाहिलेला नाहीं. एकदां मी नी रंगराव पॉवेलच्या इमारतीजवळून चाललों होतों. वाटेंत रंगरावानें आपल्या मित्राच्या विश्वासघाताची हकीगत सांगितली.

"पाजी माणूस आहे तो." रंगराव म्हणाला. "पुन्हा त्याच्यावर विश्वास ठेवणार नाहीं."

"काय रे, एवढं झालं तरी काय?"

"अरे, मला सांगितलन् फिरायला जातों म्हणून. आख्खी चौपाटी शोधली; पत्ता नाहीं."

"कुठं?—– गेला होता कुठं?"

रंगराव (डोळे वटारून) — "मलबार हिलवर!"



# (१२) नाटक–सिनेमा–सर्कस

वास्तविक 'बोलपट पहाणें' असें संकुचित नांवही या प्रकरणाला खुलून दिसलें असतें. कारण आजकाल मुंबईंत सर्कशी उतरतात कितीशा अन् नाटकें तरी पाहतात कितीसे लोक? आजमितीला सगळा मान सिनेमाला,-तोही बोलपटांना–आहे. मूकपटही आतां कुठें ऐकूं येत नाहींत. आमच्या संसारटॉकींतला मूकपटकालीन एक अवशेष म्हणून मात्र माझ्याकडे बोट दाखवायला हरकत नाहीं.

मीं तर गेल्या बारा वर्षांत एकही नाटक पाहिलेलें नाहीं. यावर कुणी म्हणेल, संसार तरी एक नाटकच आहे; अन् त्यांत तुम्ही एक पात्र आहांतच कीं! गोष्ट खोटी नाहीं. पण त्याचा अर्थ असा होत नाहीं कीं मीं इतर नाटकें पाहूं नये! 'कंपनींतलीं पात्रें बाहेर दुसरीं नाटकें पाहाण्यास पात्र नाहींत' असा कुणीं दंडक थोडाच घातला आहे?

खरें कारण असें कीं मला मुळीं नाटकच आवडत नाहीं. नाटक म्हटलें कीं गोलपिठ्यावरचीं तीं कोंदट थिएटरें दिसूं लागतात; अन् वांद्रयाहून ग्रँटरोडला पोंचेपर्यंत डोळ्यांपुढें अंधेरी येते. यामुळें एकदां तर थिएटरांत जायला निघालेला मीं गोलपिठ्याऐवजीं गोल गोल फेऱ्या मारून शेवटीं एका संभाविताजवळ दारूच्या पिठ्याची चौकशी केली होती. बरें, नाटकगृहांत शिरल्यावर तरी काय मोठा उजेड पडतो! उलट आजूबाजूचीं दृश्यें बघून तळपायाची आग मात्र मस्तकाला जाते. प्रत्येक खुर्चींत बसलेले शंभर ढेकूण सोडले तरी

उरलेला एकटा प्रेक्षकसुद्धां सतावून सोडायला कमी करीत नाहीं. तोंडांतून धूर सोडीत नसला तर निदानपक्षीं तोंडाची वाफ तरी तो हमखास दवडतोच.

या 'वायुपित्यां'ना कंटाळून समोर बघावें तों पडद्यामागूनही धूपारतीचे मेघ लकटत लकटत बाहेर येत असतात. अन् पडदा वर गेल्यावर तरी वातावरण निवळतें असें थोडेंच आहे! उलट मग तर ॲक्टर लोकांची वटवट, प्रॉम्प्टर लोकांची पुटपुट, अन् पडदेवाल्यांची किटकिट (नको तेव्हां धडाधड पडदे पाडतील अन् एरवीं रंगभूमीच्या कोपऱ्यांत भीमाची स्वारी गदेवर डोकें ठेवून विडी पितांना दिसली अन् त्यामुळें कानांचे पडदे फाटतील इतका गोंगाट प्रेक्षकांनीं केला तरी नाटकाचे पडदे आपले वरच!), या सगळ्या प्रकारामुळें कुठून बुद्धि झाली नी नाटकाला आलों अशी चुटपुट लागते.

शिवाय नाटकाला जाऊन परत यायचें म्हणजे एकप्रकारें पुनर्जन्माचाच काळ असल्यामुळें तुम्हीं आम्ही सगळा गोतावळा घेऊनच जातों. स्त्रियाही आपलीं तान्हुलीं घेऊन गॅलरींत बसतात. त्यामुळें खालच्या प्रेक्षकांना कधीं कधीं असें म्हणण्याचा प्रसंग येतो कीं मृच्छकटिक चालू आहे तें स्टेजवर कीं इथें? आणि दारुड्या सुधाकराचें दरडावणें ऐकून जेव्हां आख्खी गॅलरी टाहो फोडते तेव्हां ज्याच्यासाठीं आम्हीं पैसे मोजले ते सिंधूचे सुप्रसिद्ध हुंदके त्यांत केव्हांच लुप्त होऊन जातात.

नटांविषयीं विचाराल तर वाक्यागणिक घसा फोडणारा पुराणा भीमदेवही मला आवडत नाहीं किंवा नाटकाच्या निमित्तानें वारंवार

घशांत चहा ढोसणारा आधुनिक अण्णासाहेबही मला पसंत नाहीं. तुम्ही असा विचार करा कीं, भरजरी पोषाख घालून व तोंडाला पावडर लावून चिरूट फुंकीत किंवा अगदींच मद्य नसलें तरी किमानपक्षीं सरबत पीत हे लोक तुमच्याकडे उसन्या गांभीर्यानें पहात असतात, त्या वेळीं संताप नाहीं का येत तुम्हांला? एक दिवस गोदीनें शंका काढली होती त्याप्रमाणें कशावरून हे लोक मनांतल्या मनांत तुम्हांला 'टुकटुक माकड' करीत नसतील? माझी तिडीक मस्तकाला जाते ती खुर्चींतले ढेकूण चावल्यामुळें नव्हे, तर या एकंदर मानवी लीला बघून.

अहो, एरवीं मनुष्यप्राणी या मुंबईंत थोडे का भेटतात! रस्तोरस्तीं तर बिचारीं माणसें पडलेलीं आहेत. अन् असंबद्ध बडबडण्यांत व विशिष्ट हातवारे करण्यांत गुंग झाल्यामुळें जर तीं एकमेकांवर आपटूं लागलीं तर वैताग आल्याशिवाय राहील का? खांबावर आपटतांच दिलगिरी दाखवून खांबाला रुमाल बांधणाऱ्या 'चक्रम' प्रोफेसरची जी गोष्ट सांगतात तिचें मला तरी नवल वाटत नाहीं. कारण पावलोपावलीं जिथें अकलेचा उजेड पाडणारीं माणसें तुमच्यावर आदळताहेत, तिथें दिव्याचा खांब कोणता हें अचूक कसें तुम्ही ओळखणार?

समाजाबद्दलच्या जागृतबुद्धीनें मी सांगतों कीं समाज टिकवायचा असेल तर माणसें टिकवलीं पाहिजेत. अन् माणसें हीं, त्यांच्या पायावर पाय देऊन किंवा पाठींत ढुशी मारून अगर बरगडींत टोंचण्या देऊन किंवा त्यांच्या कानांचे ड्रम फोडून, टिकत नसतात. माणसांनींच माणसांना शान्तपणा द्यायचा असतो. पण मुंबईंत पहावें तों उलट. प्रत्येकानें प्रत्येकाचा पाठलाग करण्याचा जणूं विडाच

उचललेला. त्यामुळें होतें काय कीं, मारे निर्मनुष्य जागा पाहून खाडीवर जाऊन बसावें तों चार दोन कोळी— बेटे नांवाचे कोळी! एरवीं माणसेंच— आपलीं जाळीं वगैरे घेऊन नेमके तुमच्या नाकासमोर आलेच म्हणून समजावें.

माणसांनीं वैतागलेल्या मुंबईकर माणसाला चित्रपट आवडतो तो एवढ्यासाठींच. कारण सिनेमा चालू असतांना अंधार केला जातो अन् त्यामुळें एकही माणूस आपल्याला किंवा आपण त्याला दिसत नाहीं. पडद्यावरचीं पात्रेंही खरींखुरीं हाडाचीं (in flesh) नसतात; त्यामुळें त्यांनीं चॉकलेटचे डबे फस्त केले तरी आमच्या गोदीला त्याचा राग नाहीं अन् गुंडूलाही सिनेमांतल्या तलवारीचा, बंदुकीचा नी तोफेचा तात्कालिक लोभ नाहीं. कारण नाटकाला एकदां गुंडूला मीं पाठवला होता अन् त्या वेळीं अफझुलखानाची तलवार हिसकावण्यासाठीं त्यानें स्टेजवर उडी मारली होती असें माझ्या ऐकिवांत आहे. बरें, पात्रें जरी खरीं माणसें नसलीं तरी खऱ्या माणसांचीं तीं हुबेहुब चित्रें असतात अन् आजकाल तर तीं बोलतातसुद्धां. त्यामुळें गंमत अशी होते कीं प्रत्यक्ष माणूस नसून ज्यांत माणुसकी (Human Element) आहे असा एक कल्पनारम्य प्राणी बघायला मिळतो. तुमचें भडकलेलें मन रमतें, रंगतें, रिझतें, तें याच देखाव्यामुळें.

सर्कसदेखील मला एवढ्याच कारणासाठीं आवडते. सर्कशींत माणसांप्रमाणें सिंह, वाघ, घोडे नी माकडेंसुद्धां असतात अन् क्षणभर आपण मुंबईंत नसून कारवारच्या जंगलांत आहों असें वाटतें. आमच्या घरीं सर्कशीचा मोठा भोक्ता म्हणजे गुंडू. तसें म्हटलें तर गोदीला नी सौभाग्यवतीलासुद्धां सर्कस फार आवडते. गुंडूला विशे-

षतः मोटारीचें प्रचंड उड्डाण अन् सिंहाच्या पिंजऱ्यांतलें रिंगमास्तरचें काम फार पसंत पडतें. एकदां तर त्यानें काळ्या चड्डया घातलेलीं तीं लहान लहान पोरें पाहून आपणही याच सर्कशींत नोकरी धरणार म्हणून हट्ट धरला होता. पण गुंडूचा हा निश्चय जाहीर झाल्यानंतर दुसऱ्याच दिवशीं सर्कशीनें गाशा गुंडाळून पलायन केल्यामुळें गुंड्याच्या बेतावर विरजण पडलें. गोदीला आपली ती तारेवरची कसरत अन् बशा चाकू फेकण्याची व लगेच झेलण्याची गंमत भारी आवडे. या खेळाडूंनीं वास्तविक चहानें भरलेले सिंगल कप भराभर प्रेक्षकांकडे फेकावे अन् प्रेक्षकांनीं ते रिते करून तितक्याच सफाईनें परत खेळाडूंकडे टाकावे म्हणजे और 'मजा' येईल, अशीही गोदीनें एक सूचना केली होती व सौभाग्यवतीनें तिचें कौतुक करून 'पोरीचं म्हणणं तरी कळवावं म्यानीजरला' म्हणून उपसूचना मांडली होती. पण पेले परत करण्याच्या बाबतींत जबाबदारी घेण्यास मी तयार नसल्यानें 'मॅनेजर निलगिरी चहाच कशावरून वापरीत असेल?' अशी शंका काढून मीं बूट रद्द ठरवला. सौभाग्यवतीची आवडनिवड तशी विशेष नाहीं. पण पोपट बंदूक उडवायला लागला किंवा साहेबी कपडे करून माकड सायकल चालवायला बसलें कीं आतां ही टाळ्या पिटणार अशी भीति वाटून मी छोटूला झटदिशी माझ्या हातांत घेत असें. मला स्वतःला 'घोडेका दाम बोलो' हा दोन विदूषकांतला प्रसिद्ध सीन विशेष आवडे. कारण त्यामुळें व्यवहारज्ञान वाढतें अशी माझी समजूत आहे.

सर्कशीची भाषा भूतकालांत बोलण्याचें कारण एवढेंच कीं हल्लीं आम्ही सर्कशीला जात नाहीं. आणि हा प्रघात बंद पाडायलाही

सर्कशीचा भगत गुंडूच कारण झाला. गुंडू चार वर्षांचा असतांना आम्ही एक भयंकर सर्कस पहायला गेलों होतों. तोफेच्या तोंडीं माणूस देण्याचा तो खेळ होता. अन् माणसाला दारूसारखा ठासून आंत भरून जेव्हां मॅनेजरनें तोफ उडवली तेव्हां प्रचंड हर्ष होऊन गुंडू गॅलरींतून गडगडून सात फूट खालीं कोसळला होता. बरें तर बरें, खालीं त्याच वेळीं एक फाटके कपडे घातलेला मनुष्य* उभा होता. त्यानें आपला सदरा पसरून गुंडूला नेमका पकडला अन् गुंडूनेंही सदऱ्याच्या भागांतून हातपायच तेवढे बाहेर काढून सदऱ्यांत शरीर सामावण्याची सावधगिरी ठेवली. त्यामुळें अपघात होण्याचा टळला. पण त्याच वेळीं 'तुला सर्कशीला नेणार नाहीं' अशी मीं धमकी दिली अन् ती आजतागायत पाळली आहे.

पण सर्कशीला गेलों नाहीं तरी सिनेमाला जायचें थोडेंच कधीं चुकतें आहे ? बोलपट बघायला जाणें म्हणजे आमच्या घरचा तो एक मोठा समारंभच आहे. 'बांदरा टॉकीं'त एकादा मराठी बोलपट येणार अशी कुणकुण सुरू झाली कीं लगेच गुंड्यानें जाहिरातींचें एक भेंडोळें माझ्या टेबलावर आणून ठेवलेंच म्हणून समजावें. पण मी खमक्या असल्यानें अगोदर तिकडे लक्षच देत नाहीं. मग जेवतांना गोदी गोष्ट काढते अन् गुंड्याला म्हणते, "काय रे गुंड्या, आला का तो सिनेमा बांदरा टाकींत ?" लगेच गुंडयानें तोंडाचा पट्टा सुरू

---

* गुंड्याला वांचविणारा उपरोक्त मनुष्य तंबूच्या कापडाखालून चोरून सर्कस पहायला आला होता असे नंतर कळून आलें व त्याबद्दल त्याचा कान धरून त्याला गचांडीही मिळाली. गुंडूचे कोणी कितीही भलें करा, त्याच्याकडून कधी कुणाचें चांगलें व्हायचें नाही याचें हें एक उत्तम उदाहरण आहे.

करून बोलपट केव्हां येणार, त्यांतले तारे कोणते वगैरे माहिती देण्यास सुरवात केली म्हणून समजावें.

वास्तविक गुंडयाला ताऱ्याब्रिऱ्यांच्या बाबतींत विशेष गम्य नाहीं. ऐकलेल्या चार बाता झोडीत असतो एवढेंच. गुंडयाची आवड मला ठाऊक आहे. चार ठोसे देणारा अन् चार खाणारा खलनायक त्याला आवडतो, पण त्यांतला 'नाजूक भाग' मात्र त्याला मान्य होत नाहीं. एकदां एका मारपीट सीरियलमध्यें नायक नायिकेला खांद्यावर टाकून कडयावरून जातो आहे; पण तिचें ओझें जवळ असल्यानें त्याला उडी टाकायला भीति वाटते आहे, असें दृश्य होतें. त्या वेळीं डाव्या तळव्यावर उजव्या हाताची मूठ आपटून "काय हो बाबा, हा गाढव आहे! तिला कड्यावर ठेवून एकटाच कां नाहीं कुदत?" असा सरळ सवाल त्यानें केला होता. 'हरिकेन हंसा' पाहून आल्यावर दोन दिवस आमच्या घरांत शांतता नव्हती. गुंडूनें आसपासचीं पांचदहा पोरें जमवून एक टोळी तयार केली व प्रथम एक केरसुणी घेऊन ती रागारागानें दूर फेकण्याचा आव आणला. अन् मग डोळ्यांना काळें फडकें बांधून, कंबरेला माझें उपरणें हरदासासारखें गुंडाळून त्यांत माझा चाकू खोवला व शेजारच्या किरिस्तावाचा टाम्या कुत्रा होता त्यावर आरोहण केलें अन् गांवभर ही धिंडका फिरली. संध्याकाळीं कुठेंसा पडून रक्तबंबाळ तोंडानें तो परत आला म्हणून. नाहीं तर "मै हरिजनकी हरिकेन हंसा कैसी बनी?" अशा तऱ्हेची त्याची मुलाखत घेऊन ती 'आनंद' मासिकाला पाठवण्याचा गोदीचा विचार होता.

एकंदरींत हे करमणुकीचे सगळेच प्रकार अखेर माझा वैताग

वाढवण्यास कारण होतात. पण अर्थात् हे दिवसच असे आहेत कीं सिनेमाकडे कुणीं दुर्लक्ष करून चालणार नाही. त्यामुळें कधीं कधीं जबरदस्त धाडस करून मी सर्व फलटण घेऊन 'सेंट्रल' किंवा 'मॅजेस्टिक' सिनेमाही गांठण्यास कमी करीत नाहीं. या दोनही थिएटरांत आमच्या स्वभावविशेषाचे नमुने मला पहाण्यास मिळाले ते इथें द्यावेसे वाटतात.

सर्कशीप्रमाणेंच सिनेमाच्या बाबतींत सौभाग्यवतीची नक्की आवड मला माहीत नाहीं. पण 'तुकाराम'ला गेलों तेव्हां जिजाई नी तुकारामबोवा भाकर खात झाडाखालीं बसलीं होतीं, तो सीन सौभाग्यवतीला विशेष आवडला होता व त्या वेळीं तिनें माझ्याकडे—एरवीं क्वचित् दिसणाऱ्या— सहानुभूतीनें पाहिलें होतें हें मला नक्की आठवतें !

दुसरा नमुना परवां 'प्रेमवीर' पहातांना अनुभवास आला. कौमुदी सायकलवर बसून धांवत होती व किशोरनें आपली सायकल वेगानें तिच्या पाठोपाठ चालविली होती तो देखावा. गुंडू अगदीं दोन्ही मुठी आवळून ही 'प्रेमवीरा'ची रेस पहात असलेला बघून मला नवल वाटलें. पुढें उलगडा झाला. कौमुदीच्या घरीं दोन्ही सायकली पोचलेल्या पाहून गुंडू निराश होऊन धाडदिशीं खुर्चीत बसला व म्हणाला, "हात्तिच्या ! मला वाटलं ती बया सायकलसकट कड्याखालीं पडेल म्हणून !"

---

## (१३) शेवटीं काय ?

मुंबईच्या राहणीला वैतागल्यामुळें अलीकडे असें वाटायला लागलें आहे, कीं कुठून झक मारली नी इकडे नोकरी धरली ! त्यापेक्षां कोंकणांत आमच्या म्हशेळी गांवीं राहून जर भिक्षुकी केली असती तर आज चार दिडक्या कडोसरीं बांधून 'हरि हरि' तरी केलें असतें. म्हणजे आज दिडक्या जवळ नाहींत असें नाहीं म्हणत मी. उलट नोकरीबिकरी बरी मिळाली; तेव्हां थोडीबहुत रक्कम जमली आहे बँकेंत. नक्की आंकडा विचाराल तर तो मलाच ठाऊक नाहीं. कारण, परवांच्या पावसाळ्यांत माझे खण उपसून गुंड्यानें सेविंग्ज् बुकाची केव्हांच नाव बनवून टाकली. (त्याचा वाटतें, फळीवरच्या 'क्रॉनिकल'पर्यंत हात पोंचत नव्हता.) आतां नवें डुप्लिकेट पुस्तक घेईन तेव्हां कळेल पुंजी किती आहे ती.

पण मी कोंकण बरें म्हणतों तें अनेक कारणांसाठीं. एकतर तिकडे पैसे थोडे मिळाले तरी ते शिल्लक राहण्याची आशा असते. कारण आवक गव्हाएवढी असली तरी जावक मोहरीएवढी असायची. बिचाऱ्यांना फॅशन कशाशीं खातात तें ठाऊक नाहीं; मग खर्च होईल कुठून? आठ दिवसांनीं एकदां शहरचा बाजार आटपून बैलाची गाडी परत आली कीं जिथें तमाम गोतावळा उभा राहून तिला सानंद सलामी देतो आहे, तिथें ट्रॅम–लोकल–बशींत कोलांट्या उड्या मारतांना जी तगमग होते तिची त्यांना कुठून कल्पना येणार? खरोखर, तो मरीन ड्राइव्हचा रस्ता ओलांडतांना पेकाट असें मोडून

जातें कीं, क्षणभर भास होतो : ही मोटारींची निर्वेध रांग म्हणजे आपल्या पाठीच्या कण्यांतले निखळून पडलेले मणके तर नव्हत ?

बँकेंतल्या अकाऊंटबद्दल म्हणाल तर तो अंकगणितांतल्या दोन तोटीवाल्या बंबासारखा असतो. त्यांत आज शंभर रुपयांची भर घातली तरी उद्यां दीडशेंचा चेक— सौभाग्यवतीच्या लुगड्यांसाठीं म्हणा, किंवा गोदीच्या कलाकुसरी हौसेखातर म्हणा— लिहावा लागणार नाहींच असें सांगवणार नाहीं. शिवाय गोदू पोरगी आतां केव्हांतरी गळ्याला लागणारच. अन् मग हुंडा म्हणून एकादी जबरदस्त हुंडी फाडावी लागणार नाहीं अशी तरी हमी या सुधारणा-युगांत कोण देऊं शकेल? गुंडू मात्र तसा पैशासाठीं 'डसत' नाहीं. कारण त्याचे सगळे उद्योग बिनपैशाचे असतात! पण या सगळ्याचें पारणें तो एक दिवस खाड्दिशीं फेडून टाकील अशीही भीति मनांत डांचत असते.

पोरगा द्वाडाचा खर्चिक नसला तरी रक्ताचा मात्र 'वाह्यात' आहे. गुंडूच्या वीस बोटांपैकीं एकाददुसरें दुखावून त्यांतून रक्त वाहून गेलें नाहीं असा दिवस आठवड्यांतून एकादाच येत असेल. अन् मान मोडेल पण मन रमेल अशी गुंड्याची एकंदर प्रवृत्ति असल्यानें त्याचा धुळींतला हैदोस पूर्ववत् चालू राहतो. त्यामुळें पोरगें कधीं धनुकलीसारखें वाकडें होईल नी मोठ्या डॉक्टरला बोलावणें भाग पडेल याची खात्री देववत नाहीं.

घराकडून ऑफिसकडे अन् ऑफिसकडून घराकडे! तोच रस्ता, त्याच गाड्या, त्याच त्याच इमारती, तींच वाहनें! हीं दृश्यें पाहून कधीं कधीं असा वैताग येतो कीं, डोळे मिटतील केव्हां असें

होऊन जातें. क्षणाची उसंत नाहीं कीं निमिषाची फुरसत नाहीं. कान किटवायला रेडिओ, ग्रामोफोन अन् खडबड करणाऱ्या ट्रॅम-गाड्या तयार आहेतच. कुठें तें शान्त निर्जन कोंकण, अन् कुठें ही माणसांची पेटलेली होळी !

आज म्हशेळीला असतों तर माडाच्या झावळींनीं शाकारलेल्या झोंपडींत आरामशीर पडलों नसतों ? गुंडू-गोदींना 'सांवऱ्यां'त जांब तोडायला पाठवलें नसतें ? सौभाग्यवतीला 'अगो' तेवढा काल पाड-लेला फणस घेऊन ये गो. फोडी करून खाऊंसया तरी !' अशी प्रेमळ आज्ञा दिली नसती ? अन् तिचें फणस चिरणें चालू असतांना झोपाळ्यावर बसल्या बसल्या मंदगतीनें झोके घेत तिच्याशीं 'आज मिळालेल्या दक्षिणे'बद्दल गप्पा मारल्या नसत्या ? वक्तशीरपणें 'क्रियॅं — क्वॉव् —' करणारा झोपाळा अन् मध्येंच झाडावर ओरडणारे पोपट अगर किंचाळणारीं माकडें यांच्याखेरीज ती सुखशान्ति भंग करणारा आवाज कोणींतरी काढला असता का ? ——पण गाढवपणा केला नी या वैतागवनांत आलों !

वैताग वाढीला लागून लागून अलीकडे तर माझ्या बाबतींत त्याचें वैराग्यांत रूपान्तर होत आहे. तसें म्हणाल तर विरक्तीचें पहिलें बीज माझ्या मनांत गुंड्यानें आपल्या बारशाच्या दिवशींच पेरलें. पाळण्यांत पडल्या पडल्या मुठी वळवळून पोर कडीपाटाकडे अशा नजरेनें पहात होतें, कीं पुढेंमागें ही स्वारी गणितांत कच्ची राहिली तरी खाल्ल्या घरचे वांसे मोजायला कमी करायची नाहीं असा मला तेव्हांच संशय आला ! म्हणजे वाईट रूढार्थानें नव्हे, तर आपल्या अंगच्या खोडसाळपणामुळें ! पुढें अनेक घरगुती घरघरींनीं

अन् हपिशी हल्ल्यांनीं या विरक्तींत भर पडत गेली व शेवटीं चौपाटीवरचा तो साधूंचा म्हणा, भोंदूंचा म्हणा, तांडा जेव्हां मीं बघितला तेव्हां या विरक्तीनें उच्चबिंदु गांठला.

एक दिवस तर चक्क मनांत आलें कीं, संसारबिंसार सब झूट आहे. अन् मुंबापुरी सगळ्या दुःखांची 'रूट' आहे. तेव्हां झाडून सगळ्यांचा त्याग करून हिमालयांत पळ काढावा अन् अंगाला राख-बीख फांसून संन्यासी बनावें. लगेच मीं स्वामी रामतीर्थ वगैरेंचे ग्रंथ वाचायला सुरवात केली; एका जुन्या धोतराला काव फांसून भगवें स्वरूपहि दिलें. एक दिवस अचानक सर्वांच्या हातावर तुरी देऊन सूंबाल्या करावा असा बेत केला. पण दुसऱ्याच दिवशीं गुंडूनें माझ्या ट्रंकेंतून माझी नवी छाटी काढून "बाबांनीं झेंडा आणला! बाबांनीं झेंडा आणला!" म्हणून ओरडत घरभर थैमान केलें. त्यामुळें सौभाग्यवतीच्या एकंदर प्रकार लक्षांत आला. संध्याकाळीं ऑफिसांतून घरीं परत आल्यावर एका उंच बांबूवर फडकणारा तो भगवा 'झेंडा' पाहिल्यावर माझेंही अर्धें अवसान गळालें हें कबूल केलें पाहिजे.

अर्थातच त्या दिवशीं सौभाग्यवतीकडून चांगला ताशेरा मिळाला अन् बऱ्याच उत्साहावर विरजण पडलें. माझ्या विक्षिप्त वागण्यानें तिला अगोदरच थोडीबहुत शंका आली होती. ट्रंकेंतील ती छाटी अन् जुन्या बाजारांत पैदा केलेली कुबडी पाहून तिची खात्रीच झाली. मग झाडून सगळें घर डोक्यावर घेतलेंन् तिनें. वीररस, करुण-रस, सगळे पाघळलेन्; आणि त्यामुळें माझा भक्तिरसही पुष्कळसा आटून गेला.

"कसलं खूळ घेतलं आहे हें डोक्यांत ? म्हणे मी संन्यास घेणार! चांगला सुखाचा संसार—"

"सुखाचा संसार?" मी दांतओठ चावून ओरडलों. "कांहीं बोलायला वाटतं तरी का तुला ? कीं आपलं दुःखावर डागण्या द्यायच्या म्हणून कांहींतरी भकते आहेस ?"

आणि एवढें बोलून दोन्ही हातांनीं चिपळ्या वाजविण्याच्या आविर्भावांत मी डोळे अर्धवट मिटून म्हणालों, "सुख पाहतां जवापाडें !! अन्—अन् दुःख पर्वताएवढें !"

"तें कांहीं नाहीं. मी ही छाटी घेणार पोतेऱ्याला. अन् ही कुबडी होईल गुंड्याला चेंडूफळी खेळायला. बरी वाकडी दिसतें आहे.—संन्यास घ्यायचा म्हणे ! कांहीं तरी मेलं जिभेला हाड असायला हवं ! तोंडच्या गोष्टी आहेत का संन्यास घ्यायच्या ? चांगली छान बेश नोकरी मिळाली आहे, देवाच्या दयेनें गुंडूराजासारखं रत्न नी गोदूताईसारखी नक्षत्रासारखी पोर पोटीं आली आहे, मुंबईसारख्या वैभवशाली गांवांत राहतां आहां, मेली रोज टॅक्सींत बसायची ऐपत आहे; अगदीं दररोज शेकिनकलासांतनं जायचं म्हटलं--"

"पुरे! पुरे!" मी दोन्ही हातांनीं मस्तक धरून ओरडलों. "हा सोडला संन्यास. पण माझे आई! तोंड बंद कर."

आणि तेव्हांपासून खरोखरीच संन्यासाच्या कल्पनेला अर्धविराम दिला मीं ! वाटलें, जाऊं द्या ! आजतागायत जशीं वीस वर्षे या वैतागवनांत काढलीं तशीं आणखीं उरलींसुरलीं काढूं. संन्यास नाहीं नशिबांत, तर नाहीं. सर्वांनाच कुठें डोळे मिटून "नाम घेतां हरीचें--" इत्यादि म्हणत डोलण्याचें भाग्य मिळतें ? शिवाय

'संन्यास' म्हणतात तो तरी वाटतो तितका सोपा असेलच अशी हमी कुणीं द्यावी ?

आधीं तो हिमालय गांठायचा म्हटलें, तरी सोपें काम नाहीं. जी. आय. पी.चें झोन तिकीट घेऊन एकवीस दिवस वणवण भटकेन फार तर. पण पुढें कुठें तरी स्थायिक तर झालें पाहिजे? संन्यासी झाला तरी त्याला रहायला जागा तर हवी? अन् अशी जागा म्हणजे पहाडांतल्या गुहेशिवाय दुसरी कोणती असणार? तिथें जी. आय्. पी. थोडीच पोंचवणार आहे मला? काठी टेकीत टेकीत, अन् खांद्यावरची झोळी नी कमंडलु सावरीत मला तडफडत पायींच गेलें पाहिजे. आपल्याच्यानें नाहीं रे व्हायचें बाप्पा तें! रायगड चढतांना अर्धा जीव होतो माझा.

दुसरें असें कीं, रश्शांतले बटाटे कच्चे राहिले तर जिथें माझीं आंतडीं कुरकुर करायला लागतात तिथें कंद नी फंद खाऊन माझें कसें हो भागणार? पटकन् अपचन झालें तर कोणता डॉक्टर तिथें मला तपासायला येणार आहे? ज्या देवासाठीं एवढे हाल भोगायचे, तो तरी अश्विनीकुमारांची दुक्कल पाठवून देईल अशी खात्री कुठें देववते आहे? उलट खुद्द यमराजच रेडयावर बसून यायचे, अन् त्या रेडयामुळें वांद्र्याचा कसाईखाना आठवून जुन्या आठवणी जागृत व्हायच्या! पोट जड असतांना स्वप्नेंही पडायचीं गृहस्थाश्रमींचीं. कुणीं सांगावें? बरें; तें सारें जमलें. कंद नी मुळें नी दगड नी फत्तर खाऊन आंतडीं टणक केलीं, तरी पुढें काय? ती भगवी छाटी रोज धुवावी कुणीं अन् वाळत घालावी कुणीं? हिमालय लॉंड्री डागरांत नाहीं; गिरगांवांत आहे!! तेवढेंही केलें तरी एक छाटी फाटल्यावर

दुसरी द्यायला कोणता महिंद्रकर तिथें बसला आहे! अन् 'खरेदी'च्या निमित्तानें मधून मधून शहरांत फेऱ्या मारायला येण्याची कल्पना मला बिलकूल पसंत नाहीं. एकदां गेलों म्हणजे गेलों!

आणि राहणीचें सगळें जमलें समजा, अन् ठोल्यासारखा एका जागीं बसून नाकपुडया दाबण्याची किंवा एक तंगडी वर करण्याची धिट्ट वृत्ति आली अंगांत; तरी पुढें काय? एकाददिवशीं पटकन् अंगावर वारूळ चढायचें नी त्यामुळें घरीं केलेली मुंग्यांची शिकार आठवायची!!

अहिंसाव्रत पाळून किडयावर पाय न देतां जपून चालूं म्हटलें तरी त्यामुळें झुरळ मारणाऱ्या गुंडूची मूर्ति नजरेसमोर यायची. कशाचा संन्यास नी कशाचें काय? एकंदरींत भकासच वातावरण तें! कंटाळून शेवटीं आपलेंच तोंड पहाण्यासाठीं नदीच्या पात्रांत डोकावलें तर आंत आपल्या प्रतिबिंबाऐवजीं आरशांत पहाणाऱ्या गोदीचें चित्र कशावरून दिसायचें नाहीं? अन् त्यामुळें--- हो, कबूल करायला कांहीं हरकत नाहीं! ---त्यामुळें नदीच्या पाण्यांत कुंकवाच्या टिकलीएवढया जलबिंदूची भर कशावरून पडायची नाहीं?

बरें, ज्या देवासाठीं हा खटाटोप करून लठ्ठ देहाचा अस्थिपंजर करायचा तो तरी शेवटीं प्रसन्न होईल का? कोण खात्री देणार? उलट देवाच्या ऐवजीं आमची गृहदेवता मात्र घटकोघटकीं डोळ्यांसमोर येईल. सदान्कदा जरी मुक्ताफळांनीं ती माझा उद्धार करीत असली तरी एकाद वेळ खात्रीपूर्वक माझ्यावर प्रसन्न होईल, तर तीच! — देवाचें कुणीं सांगावें?

तेव्हां सांगायचें काय, तर हीं संन्यास वगैरे वेडें आपणासाठीं

नाहींत असा शहाणपणाचा विचार करून त्या कल्पनेला सध्यां विराम दिला आहे. मात्र त्यामुळें 'हल्लक हल्लक' करीत फिरणारा बैरागी एक वेळ मुंबईकरांना दिसला नाहीं, तरी याचा परिणाम म्हणून लवकरच एकादा वेडा चौपाटी रेक्लमेशनवरून फिरतांना जर यदाकदाचित् आढळला तर त्यांत त्यांनीं मला दोष देऊं नये. कारण माझ्याकडून शक्य तितके प्रयत्न मीं केले आहेत.

पण या संन्यासवृत्तीला खेदानें रजा देतांना मला गुंडूच्या त्या दिवशींच्या कृत्याची आठवण होते. विरागवृत्तीची निशाणी अशा त्या छाटीला त्यानें शौर्याचें द्योतक अशा भगव्या झेंडयाचें रूप देऊन एकप्रकारें आव्हान दिलें तर नाहीं ?— Don't retreat, but attack! असा तर तो संदेश नव्हता ?

छट्! —दुसरें मन म्हणतें, गुंडूसारख्या टिचभर व्रात्य पोराकडून धडे घेण्याइतके आपण सवंग दुधखुळे खास नाहीं!

अर्थात् संन्यासाश्रमाचा बावटा मीं तेव्हापासून खालीं केला असला तरी माझी विरक्ति कांहीं विशेष कमी झालेली नाहीं हें मी याच ठिकाणीं जाहीर करतों. आणि संन्यासी म्हणून मरण्याचें या 'संत्रस्ता'-च्या नशिबांत नसलें तरी त्याची एक अल्पस्वल्प आकांक्षा त्याच्या मित्रांकडून पुरी केली जावी अशी आशाही तो या ठिकाणीं जाहीर करतो.

ती आकांक्षा एवढीच कीं, त्याच्या पश्चात् वांद्रें येथील त्याच्या घराजवळील रस्त्यास म्युनिसिपालिटीनें 'साधु-संत-रस्ता' असें नांव द्यावें.